॥ श्रीरामसमर्थ ॥

# मुमुक्षूचे उद्गार.

अर्थात्

## मुमुक्षूंतील निवडक लेख.

---

हप्ता १ ला.

नमो ब्रह्मण्यदेवाय गोब्राह्मणहिताय च ।
जगद्धिताय कृष्णाय गोविंदाय नमोनमः ॥

संपादक व प्रकाशक

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.

मुमुक्षुकर्ते, पुणें.

मुद्रक

दत्तात्रय गणेश खांडेकर 'लॉ प्रिंटिंग प्रेस' पुणें.

श्रीगणेशचतुर्थी शके १८३०.

सन १९०८.

किंमत ४ आणे.

॥ श्रीराम ॥

# उपोद्घात.

आमच्या ' मुमुक्षु ' या साप्ताहिक वर्तमानपत्राचा जन्म माघ वद्य ४ शके १८२८ ( ता. १ फेब्रुवारी १९०७ ) रोजीं झाला असून मुमुक्षु आतां दीड वर्षांचा झाला आहे. या दीड वर्षांत तो महाराष्ट्रांतील लोकांस बराच प्रिय झाला आहे. वर्तमानपत्रांतले सर्वच लेख कांहीं टिकाऊ नसतात. बरेच लेख प्रचलित विषयांवरचे असल्यामुळे त्यांचें महत्वही तितकेंच असतें. तथापि मुमुक्षूंतले धार्मिक, सामाजिक व वाङ्मयात्मक वगैरे विषयांवरचे लेख नेहमीं वाचण्यासारखे असतात असें पुष्कळ वाचकांनीं वारंवार कळवून ते स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करावेत अशा प्रेमाच्या व आग्रहाच्या सूचना केल्यामुळे आम्ही २१ निवडक लेखांचा हा पहिला हप्ता आज श्रीगणेश-जन्माच्या सुमुहूर्तावर विघ्नहर्त्या श्रीमंगलमूर्तीसच २१ दूर्वांच्या जुडीप्रमाणे समर्पण करीत आहोंत ! या निवडक लेखांत आम्हास संग्राह्य वाटत असलेल्या काहीं लेखांचा संग्रह केला आहे. हा हप्ता वाचकांस पटल्यास दुसरा काढू. मुमुक्षूमध्यें ' रामदासीबावा ' या सदराखालीं आम्ही ८ लेख लिहिलेले होते ते लोकांस फारच आवडल्यामुळे स्वतंत्र पुस्तकरूपानें काढले आहेत. त्याच्या ३ हजार प्रति सहा महिन्यांत उडाल्यामुळे ' मुमुक्षू ' वर महाराष्ट्राच्या जडत असलेल्या प्रेमाची प्रतीति येऊन सदर पुस्तक आम्ही प्रसिद्ध करीत आहोंत.

स्वराज्यप्राप्तीचें साधन व साध्यही स्वधर्माचरण हेंच होय ' हें मुमुक्षूचें धोरण ठरलेलं आहे. त्या अन्वयें हे लेख लिहिले आहेत. "महाराष्ट्रीय संत व कवि यांचीं काव्यें आणि चरित्रें यांच्या वाचनव्यसनांत आनंदानें काळ सारीत व राष्ट्रधर्म, राष्ट्रभाषा व राष्ट्रपरंपरा यांच्याविषयीं स्वदेशबांधवांच्या ठायीं प्रेमादर उत्पन्न करीत ' मोक्षागारा ' च्या मुक्कामावर दृष्टि ठेऊन त्यांना संगे घेऊन चालूं लागणें एवढेंच या प्रसंगीं मुमुक्षूला " कळत आहे. धर्मावांचून आम्हांला तारायला कोणी समर्थ नाहीं. आमचे रोजचे व्यवहार व राजकारणही धर्माच्या प्रकाशांत आम्ही करायला शिकलें पाहिजे. धर्म हाच इहपरलोकांचे ' हिताहित दाखविणारा दीप ' आहे. आमचे सर्व इच्छित मनोरथ पूर्ण करण्याचें सामर्थ्य आमच्या धर्मांत आहे म्हणून आमच्या लोकांनीं धर्माची कांस आधीं धरावी एवढेंच आमचें निरंतर सांगणें आहे.

पुणें, मुमुक्षु कचेरी.
गणेशचतुर्थी शके १८३०. } लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.

# विषयांची अनुक्रमणिका.

# मुमुक्षूचे उद्गार.

॥ श्री ॥

## १ ॥ मंगलाचरण ॥

श्रीरामा ! जयरामा ! जयजयरामा ! विभो ! घनश्यामा ।
तुझिया पदकमलाहुनि आधार जगत्त्रयीं नसे आम्हां ॥ १ ॥
परदास्याला माझें मानस विटलें, कृपा करा देवा ! ।
स्वातंत्र्यार्थ झगडतों परि आपुला अभयकर शिरीं ठेवा ॥ २ ॥
योगक्षेम तयांचा चालविसी यति जे तुला शरण ।
निजधन त्यांतें अर्पिसि सद्भावें करिति जे तुझें स्मरण ॥ ३ ॥
ऐसें असुनी अन्नाच्छादनचिंता सुटे न चित्ताची ।
अन्नाला मी खातों, तेंहि मला, वाण नित्य वित्ताची ॥ ४ ॥
तुजला दोष कशाला लावूं माझेंचि कर्म बहु खोटें ।
तें धड असतें जरि तरि हरि ! मज नसतेंचि माडिलें पोटें ॥५॥
आतां संचित जाळी, दयाकरा ! तूंचि होसि पावकसा ।
आरोग्य, यश, सुसंपत्, दे मजला, धांव, धांव; पाव कसा ॥६॥
दुष्काळ, रोग, यांनीं झालों आधींच जर्जर त्रस्त ।
त्यांतहि गांजिति परजन धनमानांनींच होउनी मस्त ॥ ७ ॥

नाहीं स्वधर्म, नाहीं स्वराज्य, हा कोप काय देवाचा ! ।
सर्वस्व हरुनि सांगति पर, 'भांडायासि कायदे वाचा' ॥८॥
'फारच बरी निरयगति, परवशता शतगुणें करी जाच' ।
साचचि मयूर वदला, आतां हा सोसवेचिना काच ॥ ९ ॥
परराज्यजन्य दुःखें दुःसह परि तीं अपाप ओसरतीं ।
सरतीच यातना जरि जीव जगन्नायका ! तुला स्मरती ॥१०॥
गमते अमेरिका ही 'मुक्त,' बालक जपान 'साधक' सा ।
भारत मीहि 'मुमुक्षु'चि मज म्हण 'गा! धांव,'साध्य साध कसा'
व्यंकटरमणा ! संकट वारुनि दावी अकंटक सुपंथ ।
स्वंत कशास करूं ? यश-सुख दे, पाहों नको नको अंत ॥१२॥
परवशताचि निरय परि त्यांतुनि सोडील एक सत्कर्म ।
सर्व सुखांचें वर्मचि धर्म, इतरथा न पाविजे शर्म ॥१३ ॥
त्या धर्मीं मति गुंतो, जसि कां गूळासि गुंतते माशी ।
राज्य असो, मोक्ष असो, धर्मचि जीवासि येत कामाशीं॥१४॥
दे बुद्धींत सुनिश्चय, तैसा दे सुप्रसाद वाणींत, ।
सर्वेंद्रियांत भगवत्प्रेम, शिरो मन न विषयघाणींत ॥ १५ ॥
हरिपदिं मुमुक्षु सजला स्वपरार्थ वर प्रभूत मागाया ।
लावा या स्वचरित्रें संतचरित्रें प्रभूत्तमा ! गाया ॥ १६ ॥

मुमुक्षु, वर्ष १, अंक १

---

## २ जन्मसाफल्य.

### पाडव्याची भेट.

ज्यांचें कृपासुखद छत्र जनांवरी हें
यत्प्रेमपूर जगतावरि नित्य वाहे ।
त्या दीनवत्सल विभूस भजेन जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ १ ॥

सुस्नेह जे मजवरी करितात नित्य
ज्यांचें असें विमल वर्तन शुद्ध सत्य ।
आनृण्य जोडिन तयां सुखवूनि जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ २ ॥

ज्यांनीं परार्थ बहु कष्टविलें स्वदेहा
नाहीं कधींहि गणिलें सुखवित्तगेहा ।
त्यांच्या समान जनकार्य करीन जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ ३ ॥

जे शूर, वीर, कवि, साधु, विचारवंत,
जे राष्ट्रनायक, धुरंधर, जे महंत, ।
त्यांच्या स्मरेन कृति पुण्य उदार जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ ४ ॥

ज्यांनीं स्वदेशयश भूवरि गाजवीलें
ज्यांनीं स्वदेशइतिहासहि साजवीले ।
त्यांचे चरित्रगुण गाइन नित्य जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ ५॥

ज्यांच्या मनीं दिसति मूर्तिहि पूर्वजांच्या
सद्ग्रंथ पुण्य कृति रम्य अपूर्व ज्यांच्या ।
त्यांचा मनीं सदुपदेश ठसेल जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ ६ ॥

आंगावरी चढवुनी सुविचाररत्नें
भाषासती सजविली जिहिं फार यत्नें ।
शोधोनियां जिहिं सनातनधर्मतत्व
केला स्वभारतसमाज जिहीं ससत्व ॥ ७ ॥

त्यांचा सुवंशज असेचि खरा खरा मी
मन्मातृयौवनकुठार नसे हरामी ।
ऐसें जगा प्रकट दाविन साच जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ ८ ॥

" शीलार्थ संतत झटा, न धनार्जनार्थ,
यज्ञार्थ अर्थ मिळवा, न सुखार्जनार्थ ' ।

हा संतबोध मनिं पूर्ण भरेल जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ ९ ॥

आपद्गत स्वजन पाहवती न डोळां
तत्क्लेश ते बघुनि होतहि जीव गोळा ।
तद्दुःख दूर करण्यास झटेन जेव्हां
मज्जन्म हा सफल होइल जाण तेव्हां ॥ ११ ॥

स्वदेशबंधु इष्ट रे ! स्वदेशबंधु मित्र रे ।
स्वदेशबंधु सोयरे स्वदेशबंधु धायरे ।
जो प्रयत्न जो मनुष्य तद्धितांसि आडवा
त्यासि आड सारुनी करीन गोड पाडवा ॥ ११ ॥

मुमुक्षु, वर्ष १, अंक ७.

---



## ३ मुमुक्षु.

संसारदुःखें दुखवला । त्रिविधतापें पोळला ॥
निरूपणें "पालटला" । अंतर्यामीं ॥ १ ॥
अहंता सांडूनि दूरी । आपणासि निंदी नानापरी ॥
मोक्षाची अपेक्षा करी । या नांव मुमुक्षु ॥ २ ॥

—श्रीसमर्थरामदास.

१. "मुमुक्षू" चें जाहीरपत्रक गेल्या महिन्यांत प्रसिद्ध केलें होतें, त्यांतील महत्वाचें तेवढें अवतरण प्रथम पुढें देतों:—सध्या आमचें सारें राष्ट्र मुमुक्षावस्थेंत येत आहे. अनेक प्रकारच्या तापांनी तें गांजलें आहे. शारीरिक, मानसिक, दैविक व मनुष्यकृत यातनांनीं तें सर्वतोपरी त्रस्त झालें आहे. तें आपल्याकडून धडपड करायला लागलें आहे. कित्येक वर्षांच्या महानिद्रेंतून तें खडबडून जागें होत आहे. जपानांत सूर्योदय झाला आहे व भरतखंडांत अरुणोदयाची मंद प्रभा पडूं लागली आहे. स्वदेशी चळवळीमुळें राष्ट्रांत एक प्रकारचा नवीन जोम व तेजस्विता उत्पन्न होत आहे. स्वधर्म, स्वदेश, स्वभाषा, स्वेतिहास, स्ववाङ्मय, जें जें ह्मणून आपलें आहे, त्या त्या विषयीं स्पृहणीय असा प्रेमादर उत्पन्न होत आहे. स्वदेशाची धार्मिक संपत्ति प्राप्त करून घ्यायला कोणी धर्ममुमुक्षु लागले आहेत. परराज्यजन्य यातनांचे क्लेश कमी व्हावेत ह्मणून कोणी राष्ट्रमुमुक्षु सारा देश हालवून सोडीत आहेत; गोरगरिबांना पोटभर अन्न मिळत नाहीं ह्मणून त्यांच्या दुःखबेड्या तोडायला कोणी उद्यममुमुक्षु उद्युक्त झाले आहेत; बंधमुक्त व्हावें असें सर्वांना वाटूं लागलें आहे हें सुचिन्ह आहे. ही मुमुक्षा सर्वांगानें सारखी व्हावी, मंद आहे ती तीव्रतम व्हावी; आळस, निरुत्साह, क्लैब्य, परस्परद्वेष, हे नष्ट होऊन सर्वांनीं समृद्धस्वराज्योपभोग घेण्याची पात्रता अंगीं आणण्यासाठीं कायावाचामनें अहर्निश झटावें, व स्वधर्मनिष्ठेचें अभेद्य कवच अंगावर

घालून व भगवंतावर अचल भाव ठेऊन स्वोद्धारार्थ कर्मयोगी व्हावें, हा भगवन्निदेश देशबांधवांस समजून सांगण्यासाठीं ' मुमुक्षूचा ' अवतार आहे. मुमुक्षूचें कार्य झालें कीं मुमुक्षुच साधक होईल, व श्री समर्थांसारखे सद्गुरु भेटल्यावर साधकाचा सिद्ध होण्यास कितीसा वेळ लागणार ? स्वधर्माच्या व नीतिमत्तेच्या पायावर आमच्या चळवळी आह्मी चालविल्या ह्मणजे आह्मांला श्री, विजय व भूति मिळाल्याशिवाय खास राहणार नाहींत अशी मुमुक्षूची दृढ श्रद्धा आहे. "

२. ह्या जाहीरपत्रकांतील उताऱ्याचें अमळ स्पष्टीकरण करणें व " मुमुक्षू " च्या धोरणाचें दिग्दर्शन करणें अगोदर अवश्यक आहे. ' मुमुक्षु ' हा शब्द जीवाच्या उत्क्रांतिमार्गापैकीं एका विशिष्ट अवस्थेचा वाचक आहे. आधीं मुमुक्षु ह्मणजे काय याचा नीट विचार करूं.

३. बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध असे चार प्रकारचे जीव आहेत किंवा जीवांच्या या चार अवस्था आहेत. बंधनांनीं पूर्ण जखडलेला जो जीव तो बद्ध; बंधनातून मुक्त होण्याची ' अनर्थोर्मि ' ज्याला इच्छा झाली तो मुमुक्षु; मुक्ततेच्या उपायाचें चिंतन करून त्या प्रमाणें ' क्रिया करणारा ' तो साधक व बंधमुक्त झालेला जीव तो सिद्ध. बहुतेक सारे जीव बद्ध आहेत, त्यांतून फार थोडे मुमुक्षु आहेत, सिद्धीसाठीं यत्न करणारे साधक ' मनुष्याणां सहस्रेषु ' विरल आहेत, व मुक्त तर ' सुतराम् ' विरल आहेत. बोध घेण्यास या चौघांपैकीं पात्र एकटा मुमुक्षु आहे. सिद्ध बोधातीत आहे; साधकाला निश्चित पथ गुरुकृपेनें दिसत असल्यामुळें बोधाची अपेक्षा नाहीं; बद्ध तर बोलून चालून बद्ध ! त्याच्या ठिकाणीं उपदेशाची पात्रताच नाहीं. उपदेशाला पात्र असा काय तो मुमुक्षु.

४. श्रीसमर्थांनीं दासबोधाच्या पांचव्या शतकांत बद्धादि चौघांचीं सुंदर लक्षणें दिलीं आहेत. अंधारांत चांचपडणाऱ्या अंधळ्यासारख्या ' ज्याला चक्षुविण दाही दिशा शून्याकार ' झाल्या आहेत; कर्माकर्म, धर्माधर्म,

पापपुण्य, जो जाणत नाहीं; पिंडाच्या पोषणानें नागवल्यामुळें देव, संत व सच्छास्त्र हे ज्याला लटके वाटतात; स्वधर्म, परोपकार, मृदुवचन यांची ज्याला ओळख नाहीं, व अनाचार व एककार ज्याला फार प्रिय झाले आहेत; कुटुंब-प्रपंचाचें ज्याला उदंड ज्ञान आहे, पण राष्ट्रप्रपंचाविषयीं जो अंधळा आहे; 'हातीं द्रव्याची जपमाळ । कांताध्यान सर्वकाळ' यांत ज्याचें सारें आयुष्य फुकट जात आहे; व त्याची त्याला खंतीही वाटत नाहीं; द्रव्यदारेचें भजन करण्यांत जो चूर होऊन गेला आहे, त्याला समर्थांनीं बद्ध असें म्हटलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'जयासि नाहीं आत्मज्ञान । हे मुख्य बद्धाचें लक्षण.' आपण कोण आहोंत, कोठें आहोंत, काय करीत आहोंत याविषयीं पूर्ण अज्ञान असून कनक, कांता व इंग्रजसरकारच्या कृपेनें कादंबरी ( सुरा ) यांच्या सेवनांत ज्याचा कालक्षेप होत आहे व असें असून पश्चात्तापाचा ज्याला थोडाही घाम फुटत नाहीं, तो बद्ध. स्वेच्छाविहार करण्यास ज्याला मोकळीक नाहीं, सर्व कार्यांत दुसऱ्याच्या ओंजळीनें ज्यास पाणी प्यावें लागतें तो बद्ध. ज्याच्या सर्वस्वावर पराची सत्ता चालते तो बद्ध. कनक, कांता व कादंबरी ( द्रव्य, दारा व दारू ) यांत अहोरात्र निमग्न झाल्यामुळें आत्मज्ञानविमुख झालेला जो प्राणी तो बद्ध. 'संकोचोनि लहान' झालेला, देहालाच आत्मा समजून देहाची बडेजाव करण्यांत गुंतलेला स्वधर्म व स्वदेश यांच्या उदात्त विचारांला पारखा झालेला व केवळ कुटुंब-पोषणाच्या विचारांनीं गुरफटलेला जो प्राणी किंवा जें राष्ट्र त्याला बद्ध म्हणावें.

५. याप्रमाणें बद्धावस्थेंत असलेल्या जीवात्म्या ( किंवा राष्ट्राला ) कालांतरानें खेद झाला; चंदनभ्रांतीनें ज्या संसारसर्पाला उराशीं आवळून धरिलें होतें, त्यानें आपल्या स्वभावधर्माप्रमाणें दंश केल्यामुळें अनंत तापांनीं तो होरपळून निघाला; प्रपंचाविषयीं उदासीनता उत्पन्न झाल्यामुळें आपल्या हातून पूर्वी घडलेल्या दोषांविषयीं त्याला खरा अनुताप झाला; उदरंभरण्या-साठीं जीं जीं पापें, दुष्कर्मे आचरिलीं, लांड्यालबाड्या, चुगल्याचहाड्या,

केल्या; देव, धर्म, संत, सदाचार व सच्छास्त्र या परमपूज्य पंचकाविषयीं अवहेलना केली, त्याबद्दल 'अंतर्यामीं पस्तावा' वाटूं लागला. कनककांता कादंबरीच्या यथेच्छ सेवनानें पूर्वी जो मद, अहंकार, शिगेला चढला होता तो अगत्य दशा झाल्यामुळें ओसरूं लागला; आत्मपरीक्षण करायला, दुसऱ्याचे गुण घ्यायला व आपले दोष जाळून टाकायला तो तयार झाला; आपण भोगीत असलेलीं सुखदुःखें आपल्याच बऱ्यावाईट कर्मांचीं फळें आहेत, व यासाठीं सुखैषी जीवानें चांगलीं कर्मेंच केलीं पाहिजेत हें तत्वज्ञान शिकूं लागला; आपल्या संचितकर्मांची होळी होऊन पूर्वोक्त दुःस्थितींतून आपण मुक्त व्हावें अशी इच्छा करूं लागला. याप्रमाणें सर्वप्रकारच्या दुष्ट बंधनांतून मुक्त होण्याची त्याला इच्छा झाली कीं, तो एक पाऊल पुढें गेला—तो **मुमुक्षु** या पायरीला जाऊन पोंचला.

६. मुमुक्षावस्था बळावली कीं तिसरी म्हणजे साधकाची स्थिति प्राप्त होते. आत्मज्ञान झाल्यावर त्याच्या दृढतेसाठीं निश्चित साधनांचा अवलंब करून असाध्य वस्तु साध्य करून घेण्यासाठीं कंबर बांधणारा, असत्क्रिया टाकून सत्क्रिया आचरणारा, वैराग्य व अभ्यास हे दोन मित्र सांगातें घेऊन, उपमाच्या संबीर अश्वावर आरूढ होऊन मोक्षपंथाला वेगानें निघणारा, साक्षेपी, उत्साही, धैर्यवंत जो जीव त्याला साधक असें म्हणावें. शेवटची पायरी सिद्धाची. सिद्ध तोच नित्यमुक्त. सर्व दुःखमुक्त होऊन स्वरूपाकारपणें अखंड, अवीट व निरुपाधिक आनंदाचा नित्य उपभोग घेणारा जो जीव त्याला सिद्ध असें म्हणावें. याप्रमाणें बद्धापासून मुक्तापर्यंत च्यारही अवस्थांचें दिग्दर्शन केलें. ह्या अवस्था जशा व्यक्तीला तशा राष्ट्रालाही आहेत.

७. या चार अवस्थांपैकीं दुसरी जी मुमुक्षावस्था तींत भरतखंड किंबहुना सारें आशिया खंड येत आहे. आज चारशें वर्षें खिस्ती राष्ट्रांनीं साऱ्या जगावर मोठा धुमधुमाट मांडला होता; त्याचा प्रतीकार स्वसंरक्षणार्थ

करण्याची बुद्धि पौर्वात्य राष्ट्रांत उत्पन्न होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. पांढऱ्या वर्णाच्या खिस्ती लोकांनीं इतर सर्व वर्ण पुसून टाकण्याचा किंवा तसें न झाल्यास आपल्यांत मिसळून घेण्याचा धूमधडाका चालविला होता. अमेरिकेंतल्या 'रेड इंडियन' लोकांची त्यांनीं अन्यत क्रूरपणानें कत्तल करून जगाच्या इतिहासांतून त्यांना नाहींसें केलें. काळ्यावर्णाचे आफ्रिकेंतील लोक सर्वतोपरी पादाक्रांत केले. आफ्रिका खंडाचा नकाशा पाहिला तर असें दिसून येईल कीं, त्या खंडाचे इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरे राष्ट्रांनीं ऊचके तोडून घेतले आहेत. काळ्या वर्णाच्या लोकांत प्रमुख लोक दोन. एक हिंदु व एक मुसलमान. मुसलमानी राष्ट्रांना गिळण्याचा या खिस्ती गिधाडांनीं आजवर कसा उद्योग केला हें इतिहासावरून दिसतेंच आहे. त्यांपैकीं तुर्कस्थान व अफगाणिस्थान हीं दोन राष्ट्रें मात्र आज जिवंत आहेत. हिंदुराष्ट्राची तर सर्वाधिक दैना झाली आहे. भरतखंडांत कांहीं हिंदु संस्थानें जीव धरून आहेत, अथवा त्यांना टिकूं दिलीं आहेत. पांढऱ्या वर्णानें याप्रमाणें तांबड्या वर्णाचे लोक सर्वतोपरी नष्ट केले व काळ्या वर्णाचे लोक आपल्या पंजाखालीं आणले. राहतां राहिले एक पिंवळ्या वर्णाचे लोक. हे मुख्यत: चिनी व जपानी लोक होत. चीनच्या अवाढव्य अफाट राज्यावर साऱ्या खिस्ती राष्ट्रांचा डोळा होता, पण सर्व आशिया खंडाच्या भाग्यानें जपानानें रशियनराष्ट्राला जी जबर थप्पड दिली त्यावरून 'तेजसां न हि वयः समीक्ष्यते' या म्हणीची प्रतीति सर्वांना आली व त्यामुळें पौर्वात्य राष्ट्रें खडबडून जागीं होत आहेत. खिस्ती राष्ट्रांचे कावे जपाननें पूर्णपणें ओळखले, त्यांच्या यशाचें इंगित जाणून त्याप्रमाणें आपल्याला यशस्वी केलें, परराष्ट्रांचा नेणतेपणानें द्वेष करणारें, व कूपमंडूकवत् राहणारें चिनी राष्ट्र, पण तेंही आपली कात टाकून नवीन वीर्य व सामर्थ्य पैदा करायला लागलें आहे. बालसिंह जो जपान त्यानें रशियन आस्वलाला चारी मुंड्या चित करून कसें लोळवलें हें कौतुकानें व अभिमानानें अफगाणिस्थानांतल्या पहाडांतून पडणाऱ्या अर्ध्याराचे सुद्धां बाहु वीरश्रीनें फुरफुरूं लागले आहेत.

इराणांतल्या शहाला नवीन राष्ट्रीय बळावर आपल्या देशाची सुधारणा करण्याची बुद्धि झाली आहे. याप्रमाणें 'काळ्यांचाही काळ येईल' अशी उमेद आशियाखंडाच्या अंगांत संचरत आहे. इतस्ततः पसरलेल्या इस्लामी धर्माच्या लोकांस असें वाटूं लागलें आहे कीं, सर्वांनीं एकजुटीनें व निश्चयानें वागून आपलें गमावलेलें ऐश्वर्य परत मिळवावें. जपानच्या शिकवणीनें चीनदेश जागा झाला तर हें 'पिवळें संकट' आपणावर येईल कीं काय, अशी भीति 'पांढऱ्या' वर्णाला उत्पन्न होत आहे तोंच 'हें पांढरें संकट' आपल्यावरचें कसें टळेल व आपला काळेपणा वर्णानें गेला नाहीं तरी यशानें आपण 'पांढरें' कसें होऊं हा विचार तमाम काळ्या लोकांच्या डोक्यांत आज खेळूं लागला आहे! आज चारशें वर्षें पाश्चात्य लोकांनीं जगभर हुतुतू घातला. यापुढें पौर्वात्य लोकांना स्वराज्यसुखानुभव घ्यावा अशी त्या परम दयाळु जगन्नाथाला इच्छा झाली आहे; अशा तारा परमेश्वराच्या दरबारांतून सुटल्या आहेत! परमेश्वरी सत्तेने सारें विश्व चाललें आहे. वरील प्रकारच्या तारा जपान, चीन, अफगाणिस्थान, इराण, हिंदुस्थान वगैरे सर्व देशांत आल्या आहेत! हिंदुस्थानांत राजकीय बाबतींचा खल करणाऱ्या अशा कित्येक व्यक्तींनासुद्धां या तारा येऊन पोंचल्या आहेत, व म्हणून तर राष्ट्रीयपक्ष अस्तित्वांत आला आहे! गरम व नरम, जहाल व नेमस्त, जुने व नवे-साऱ्या लोकांच्या अंगांत बिलक्षण सामर्थ्य उत्पन्न करून सर्वांना एकाच कार्याला लावण्याची शक्ति भगवंताच्या इच्छेंत आहे! भगवंताच्या प्रेरणेनुसार मनुष्य वागेल तर काय होणार नाहीं?

८. मुमुक्षावस्थेचा काळ फार महत्वाचा व जबाबदारीचा असतो. त्यावेळीं मनोवृत्ति स्वभावतःच उच्छृंखळ होतात, पण त्यांना विवेकानें आवरलें पाहिजे. मुमुक्षु आपल्या हिताविषयीं नेहमीं दक्ष असला पाहिजे. त्यानें सर्व कर्में जागेपणीं केलीं पाहिजेत. प्रत्यक्ष भोगाव्या लागणाऱ्या यातनांमुळें पदोपदीं तोल जाऊन डोकें फिरून जायचा संभव असतो, पण सर्वकाळ डोकें थंड ठेवायचा त्यानें दृढाभ्यास केला पाहिजे. इंद्रियजयाशिवाय यशस्वी होणें

शक्य नाहीं. इंद्रियदमनाची मुमुक्षूला अत्यंत अवश्यकता आहे. जे त्याच्या नाशार्थ टपलेले असतात, त्यांच्या कपटजालांत न पडतां, व त्यांच्या वरकरणी मायिक प्रेमास न भुलतां त्यानें आपल्या साध्याकडे निरंतर लक्ष ठेविलें पाहिजे. 'उद्धरेदात्मनात्मानं' हें तत्व त्यानें उराशीं घट्ट बाळगून ठेविलें पाहिजे. आपल्या संकटांत आपल्या कामास कोणी पडत नाहीं हा सृष्टिक्रम ओळखून आपल्या स्वतःच्या मनगुरावर सर्वतोपरी भिस्त ठेवून त्यानें धिम्मे-पणानें पुढें पाऊल टाकलें पाहिजे. त्यानें देहदुःखानें कदरूं नये. मुमुक्षूला तेजस्विता पाहिजे, पण ती नित्य रक्षून प्रसंगीं बाहेर काढावी; नित्य ओकीत बसण्यांत फायदा नसतो. स्वावलंबन त्याच्या पांचवीला पुजलें असेल तरच त्याला मोक्षप्राप्तीची आशा आहे. मुमुक्षु कसाबापुढें मान वांकविणारा बकरा नसावा, क्षणोक्षणीं निष्कारण भुंकणारा कुत्रा नसावा, अविवेकानें हवे त्याशी टक्कर घेणारा रानडुक्कर नसावा, तर धिम्मा, शांत, व प्रसंगीं न डगमगणारा '**केसरी**' असावा. नेभळट नसावा, पण तामसीही नसावा. अनंत आपत्तींनीं जर्जर केलेला, संकटांनीं भिवविलेला, शत्रूंनीं वेढलेला असला तरी आत्मदमन करण्यास समर्थ असा असावा. मुमुक्षावस्थेला तेजस्विता तशीच मुत्सद्देगिरीही पाहिजे. मुमुक्षु कणखर असावा. मुमुक्षूला आरोग्य व द्रव्यबल पाहिजे; विवेक व हिंमत पाहिजे; निरिच्छता व पूर्ण स्वावलंबन पाहिजे; भगवद्भक्तीचें शुद्ध प्रेम व संतांचे आशीर्वाद पाहिजेत; सर्व सद्गुण पाहिजेत; पण मुख्य गोष्ट पाहिजे ती ही कीं, साध्यावर निरंतर लक्ष पाहिजे–

**मुख्यमेकं पुरस्कृत्य शून्यात्मानोपि साधकाः।**
**भवन्ति तं विना नैव यथा संख्यांकबिंदवः ॥ १ ॥**

शून्याला किंमत नाही, पण त्याचे मागें एखादा आंकडा टाकला म्हणजे त्याला किंमत येते. दहावर जसजशीं शून्यें टाकीत जावीत तसतशी त्याची किंमत वाढत जाते. परार्धापर्यंत किंमत वाढविण्याचें सामर्थ्य एकांत आहे. त्याचप्रमाणें मुमुक्षु धार्मिक चळवळीत पडो, औद्योगिक चळवळीत पडो,

सामाजिक प्रश्नांच्या चर्चेंत सांपडो, राष्ट्रीय शिक्षणाची विवंचना करीत असो; सर्वकाल आपल्याला सर्व दुःखध्वंसी 'मोक्ष' पाहिजे हें त्यानें अनुसंधान क्षणभरही ढळतां कामा नये ! किंबहुना त्याचे सर्व व्यवसाय मोक्षाच्याच अनुरोधानें चालले पाहिजेत. ज्याला मोक्षप्राप्तीची उत्कंठा नाहीं तो मनुष्य नव्हे. मुमुक्षूची मुमुक्षा दृढ झाली कीं, त्याला साधनपंथ आपाप दिसूं लागतात. मुमुक्षूनें आपल्याचसारख्या मुमुक्षूंचा किंवा पुढें गेलेल्या साधकांचा संग करावा, म्हणजे परस्पर गुह्यकथनानें व एकांतचालनेनें त्याची उन्नति होईल. त्यानें साधकाचें सांनिध्य करावें, त्याची भेटी संपादावी, त्याच्या भाग्याचा अरुणोदय कसा झाला हे सूक्ष्मदृष्टीनें न्याहाळावें, व तद्दर्शितमार्गानें पुढें पाऊल टाकीत जावें. साधक बोलतो कसा, चालतो कसा, वागतो कसा, स्वहित साधतो कसा, हें पहात असावें, म्हणजे मुमुक्षूच 'साधक' होईल.

९. धार्मिक व नैतिक विषयाकडे आमच्या समाजाचें व आंग्लविद्याविभूषितांचें असावें तसें लक्ष नाहीं. गेल्या शतकांत भरतखंडावर जें महत्संकट आलें तें आमच्यामतें आमचें राष्ट्र आपली पूर्वपरंपरा विसरूं लागलें आहे हें होय. आमची पूर्वींची शुद्ध परंपरा सुटत चालली हीच महदापत्ति होय. ज्या राष्ट्राची पूर्वपरंपरा सुटली तें राष्ट्र रसातळास गेल्याशिवाय राहत नाहीं. असा दुर्धर प्रसंग भरतखंडावर येऊं नये असें कोण भरतपुत्र म्हणणार नाहीं ? आमचा धर्म, आमचे रीतिरिवाज, आमची वर्णाश्रमधर्मपद्धती, आमच्या चालीरीति, आमचे आहारविहार यांविषयीं इंग्रजी झाल्यापासून आमच्या लोकांचे जे कांहीं विलक्षण व विपरीत ग्रह झाले आहेत ते राष्ट्रीयत्वाची वाढ होण्यास प्रतिबंधक आहेत व म्हणून ते काढून टाकण्याचा होईल तितका प्रयत्न करणें हें 'मुमुक्षु' आपलें पवित्र कर्तव्य समजतो. आमच्या समाजांत दोष नाहींत असें नाहीं, पण त्यांकडे दुसऱ्याच्या चष्म्यानें पाहण्याची जी दुष्ट खोड आम्हांला लागली आहे ती टाकून देण्याचा आम्ही आतांपासूनच निर्धार केला पाहिजे. स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, जातिभेद, मूर्तिपूजा या विषयांनीं आमच्या सुशिक्षित लोकांचीं डोकीं आज पाऊणशें वर्षें फिरवून

टाकलीं आहेत व इंग्रजी साम्राज्याचा आदर्श डोळ्यापुढें ठेवून त्याबरहुकूम आमच्या इकडे नक्कल उठविण्याचा ते यत्न करीत आहेत ! परदेशाचे इतिहास व परदेशांतील राष्ट्रभक्तांचीं पवित्र चरित्रें आमच्या देशांतील तरुण पिढीपुढें ठेवायला आमची बिलकुल हरकत नाहीं. कोणाच्याही इतिहासांत, वाङ्मयांत व राजकारणांत जें जें म्हणून उत्कृष्ट आहे आहे तें तें घेण्यास बिलकूल कसूर करूं नये. पण सर्वकाल आपलें **विशिष्टपण** कायम राखण्याचा यत्न केला पाहिजे. आज आपणांला किरकोळ मुद्यांवर वाद करायला फुरसतच नाहीं. पृथ्वीवरच्या राष्ट्रांत काय घडामोडी चालल्या आहेत, आपण कोठें आहोंत, आपलें पाऊल झपाट्यानें व निश्चयानें पुढे पडून राष्ट्रांच्या शर्यतींत आपण पुढें जाऊन शर्यत कशी जिंकूं, किंबहुना आपण जिवंत कसें राहूं ? हा मुख्य प्रश्न प्रत्येकाच्या डोळ्यापुढें नित्य पाहिजे; यासाठीं दादाभाईनीं उच्चारलेल्या व केसरीकारांनीं प्रतिपादलेल्या **स्वराज्यप्राप्तीचें** धोरण आपणांपुढें पाहिजे. त्याच्या सिद्धीसाठीं निरुत्साह व दैन्य टाकून आम्हीं प्रचंड झगडा करण्यास सज्ज झालें पाहिजे. राष्ट्रप्रपंच हाच प्रवृत्तिमार्ग आहे. याच्या वाटेंत जीं जीं विघ्नें येतील तीं तीं दूर केलीं पाहिजेत. ह्या प्रवृत्तिमार्गाचा उत्कृष्ट बोध ' तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व ' ह्या श्लोकार्धांत भगवंतांनीं केला आहे. याच्या निशाणाखालीं राहून आम्हीं आमच्या राजकीय व औद्योगिक चळवळी चालविल्या पाहिजेत. मात्र त्या चालवितांना आंतून भगवत्प्रेरणेचें सामर्थ्य उत्पन्न झालें पाहिजे. आपला सत्पक्ष असून परमेश्वर आपला पाठीराखा आहे अशी दृढ व अढळ श्रद्धा पाहिजे व या भावनेचें दिव्य तेज आंत बाहेर कोंदाटलें पाहिजे. हा बोध भगवंतांनीं पूर्वोक्त श्लोकाच्या उत्तरार्धांत केला आहे.

**' मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् । '**

हाच खरा निवृत्तिमार्ग आहे; हा श्लोक मुमुक्षूच्या नित्य डोळ्यापुढें असावा. त्यांत श्रीगीतेचें सार सांठविलें आहे. त्यांत प्रवृत्ति व निवृत्ति, प्रपंच व परमार्थ, देशभक्ति व देवभक्ति, स्वराज्य व स्वधर्म यांचा उत्कृष्ट मिलाफ

केला आहे. **स्वराज्य व स्वधर्म यांची उत्कृष्ट सांगड हाच आमच्या राष्ट्राचा परमधर्म आहे.** स्वराज्य हा देह, व स्वधर्म हा आत्मा; स्वराज्य हा क्षत्रिय व स्वधर्म हा ब्राह्मण, स्वराज्य हा शिवाजी व स्वधर्म हा रामदास, या दोहींचा योग्य मिलाफ झाल्यास भरतखंड साऱ्या जगाला भारी होईल. दोघांचें तेज एकवटलें तर ते साऱ्या विश्वाला दुरासद व दुर्धर्ष होईल. मग ते स्वतः सर्व दुःखांपासून मुक्त होईल हें काय सागायला पाहिजे ? 'मुमुक्षूंत' धार्मिक लेख येतील ते या धोरणावर येतील. जगात नाना मते व नाना मतांतरें आहेत त्यांचा खल करण्याची मुमुक्षूला सवड नाहीं व इच्छाही नाहीं. 'विचार करितां वायां जाय काळ । लटिके तें मूळ फजीतीचें ।' या तुकाराममहाराजांच्या उक्तीकडे त्याचें लक्ष आहे. योगमार्ग, कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग असे ईश्वरप्राप्तीचे चार मार्ग आहेत. हे सर्वच मोक्षदायक आहेत; पण महाराष्ट्र साधुसंतांनी सामान्य जीवाचा अधिकार ध्यानांत आणून **आचारसहित भक्तिमार्गच** सर्व साध्य, सुलभ व सर्वोत्कृष्ट ठरविला आहे. त्या चोखाळलेल्या मार्गाने बिनधास्त जाणें हेंच श्रेयस्कर आहे. श्रीज्ञानेश्वर, श्रीनामदेव, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम व श्रीरामदास हे आमच्या भागवतधर्माचे किंवा महाराष्ट्रधर्माचे उपदेष्टे गुरु आहेत; श्रीपंढरपूर, आळंदी, देहु, पैठण व सज्जनगड हीं आमचीं राष्ट्रीय क्षेत्रे आहेत; गीता, भागवत व महाराष्ट्रसंतांच्या उक्ति व ग्रंथ यांत प्रतिपादिलेलीं धर्ममतें हींच आम्हांस सर्वथैव मान्य आहेत. ईश्वराचीं सगुण व निर्गुण दोन्हीं स्वरूपें आहेत, तरी प्राधान्येंकरून सगुणोपासनाच आम्हांला अधिक श्रेयस्कर आहे, व तिच्या सिद्ध्यर्थ मूर्तिपूजा साधुसंतांनीं अनुमोदिली आहे. **हा जो भागवतधर्म किंवा महाराष्ट्रधर्म तो आम्हां मराठ्यांचा राष्ट्रीयधर्म आहे व तो स्वराज्य आणि स्वधर्म या दोघांची ही जोड करून देण्यास समर्थ आहे.** हिंदुराष्ट्राच्या पूर्वपरंपरेशीं सुसंगत व भागवतधर्मसंमत अशा प्रकारचें धोरण 'मुमुक्षु' च्या धार्मिक व नैतिक

लेखांनीं राहणार आहे. खरी देशप्रीति व अस्सल प्रतीची धर्मनिष्ठा यांचा संयोग झाला तरच आमचा तरणोपाय आहे असें 'मुमुक्षू' चें निश्चित मत आहे.

१०. 'मुमुक्षूनें' हा जो आपल्या पुढील कार्यांचा नकाशा रेखाटला आहे, त्याबरहुकूम त्याच्या हातून कामगिरी व्हावी एतदर्थ तो श्रीविठ्ठलाची प्रार्थना करीत आहे. पांडुरंगाच्या प्रेरणेनें सारे विश्वाचे व्यापार आणि राष्ट्रांच्या उलाढाली चालल्या आहेत. आमची राष्ट्रीय मुमुक्षा तरी त्याच्याच कृपालवाचें फळ आहे. मग गरीब बिचाऱ्या 'मुमुक्षू' चा जन्म तरी त्याच्याच स्फूर्तीनें झाला आहे असें कां न मानावें? 'मुमुक्षू' नें अंगिकारलेल्या कार्यांत त्याला यश द्यावें, त्याला कार्यकर्ता करून कृतार्थ करावें, महाराष्ट्रांतील भूत व वर्तमान पुण्यपुरुषांनीं प्रेमाशीर्वादांचा वर्षाव या दीन लेंकरावर करून त्याला हातीं धरावें व त्याला सत्पथ दाखवावा अशी त्यांचीही प्रणतिपूर्वक विज्ञप्ति करितों.

श्रीमन्मंगलमूर्तीनें " माझिये हृदयीं भरावें। सर्वकाळ वास्तव्य करावें। मज वाक्शून्यामीं वदवावें। कृपाकटाक्षें करूनी।" अशी त्याची प्रार्थना आहे. महाराष्ट्राला स्वधर्म व स्वराज्य यांची ओळख पूर्वीपासून आहेच, या लेंकरानें त्याला काय शिकवावें म्हणा, पण याचे बोल त्यानें लडिवाळपणाने व प्रेमानें ऐकावें हीच प्रार्थना करून महाराष्ट्रवाचकांस विनंति करितों कीं:—

तरी न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें॥
करूनि घ्यावें हें तुमतें। विनवित असें॥१॥

मुमुक्षु, वर्ष १, अंक १.

# ४ राष्ट्रीय मुमुक्षुत्व.

१. वेदांतशास्त्राच्या मतानें मनुष्य मोक्षार्थ यत्न करूं लागण्याच्या पूर्वी त्याच्या ठिकाणीं विवेक, वैराग्य, शमदमादिषट्कसंपत्ति व मुमुक्षुत्व हीं उत्पन्न झालीं पाहिजेत. विवेक ह्मणजे नित्य आणि अनित्य यांचा निवाडा होय, विवेक ह्मणजे आत्मा आणि अनात्मा, स्वत्व आणि परत्व यांचा निर्णय होय. स्वस्वरूप ओळखतां आलें पाहिजे. आपलें आणि पराचें हा भेद जाणतां आला पाहिजे. राजहंस ज्याप्रमाणें दूध आणि पाणी वेगळें करितो. त्याप्रमाणें हें आपलें आणि हें पराचें असा प्रत्येकाला भेद जाणतां आला पाहिजे. स्वत्व आणि परत्व किंवा आत्मा आणि अनात्मा यांचा बरोबर निवाडा झाला कीं, पहिलें तेवढें स्वीकारावें आणि दुसरें तेवढें टाकावें हें कांहीं निराळें सांगायला नको. स्वदेशी आणि परदेशी यांचा विवेक करायला आपलें राष्ट्र शिकूं लागलें आहे हें सुचिन्ह आहे. आत्म्याचा स्वीकार आणि अनात्म्याचा त्याग स्वदेशी-बहिष्काराच्या चळवळींमध्यें स्पष्ट होत आहे. यावरून राष्ट्रीय मुमुक्षुत्वाचा पहिला गुण जो विवेक तो आपल्या राष्ट्राच्या अंगांत उत्पन्न झाला आहे असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

२. मुक्त होण्याची ह्मणजे मोक्षाची इच्छा करणाऱ्याच्या अंगांत पूर्ण वैराग्य उत्पन्न झालें पाहिजे. आपला देह, आपलें घरदार व आपली बायका-मुलें यांच्याच प्रेमांत गुरफटून न जाणें, कर्मफलाची आशा सोडून निर्हेतुक व निरहंकार होऊन प्राणांचीही आहुती देण्याची तयारी ठेवून आपलें पवित्र कर्तव्य करणें हें वैराग्याचें लक्षण आहे. तुकाराममहाराजांनीं ह्मटल्याप्रमाणें—'तृणवत् तनु, सोनें ज्या पाषाण' त्याच्याच ठिकाणीं खरें वैराग्य मुरलें आहे असें समजावें. देह तृणवत् वाटणें व सोनें पाषाणासारखें भासणें हीं दोन वैराग्याचीं लक्षणें आहेत. बंगाल्यांत एकामागें एक तरुण वीर कैदेची किंवा फटक्याची पर्वा न करितां देशकार्यार्थ पुढें सरसावत आहेत, बायका आपल्या अंगावरचे दागिने ओरबाडून देशकार्यार्थ अर्पण करीत आहेत,

कोंवळीं मुलें पाठीवर फटके खाण्यास तयार होत आहेत हें राष्ट्रीय वैराग्याचें लक्षण आहे. तेव्हां विवेक आणि वैराग्य हे दोन गुण आपल्या राष्ट्राच्या अंगांत उत्पन्न होत आहेत हें निर्विवाद आहे. मात्र हे गुण सर्वत्रिक झाले पाहिजेत. कोणतेंही राष्ट्र आपत्तीच्या तालमींतच हे गुण शिकत असते. अशी तालीम आपल्या सुदैवानें कर्झन–मोर्लेसारखे इंग्रज आपणांस देत आहेत, हें एकप्रकारें आपलें सुदैवच समजलें पाहिजे! शमदमादि आत्मसंयमनाचे गुण विवेक व वैराग्य या गुणांच्या पोटांतच येतात; पण हे गुण जरी असूनही तीव्र मुमुक्षुत्व जर नसेल तर ते निष्फळ झाल्याशिवाय राहणार नाहींत; म्हणून सर्वांच्या आधीं तीव्र मुमुक्षुत्व पाहिजे.

३. मुमुक्षुत्व म्हणजे मुक्त होण्याची इच्छा. मुमुक्षुत्व उर्फ मुमुक्षा जितकी तीव्र असेल तितका मोक्षप्राप्तीचा काळ जवळ येणार आहे—

**फुटो हा मस्तक तुटो हे चरण। परि हा नारायण न विसंबो॥**

अशा निग्रहाचे व करारी पुरुष अल्पकाळांतच मुक्त होतात. ‘मुमुक्षुत्व’ या पदांत दोन कल्पनांचा अंतर्भाव होतो. (१) बद्धता व (२) बद्धतेची जाणीव. आमच्या सांप्रतच्या अवस्थेत बद्धतेची जाणीव फारच थोड्यांच्या ठिकाणीं दिसून येते. आपण बद्ध आहोंत हेंच आधीं फार थोड्यांना समजतें! आपले हातपाय कसे जखडून गेले आहेत हें पूर्णपणें समजणें प्रथम अवश्य आहे. कामक्रोधादि रिपु आपल्या छातीवर नाचून आपणांस कसें लोळवितात हें आत्मपरीक्षणाच्या नित्य अभ्यासानें ज्याला जाणवतें त्यालाच आपल्या बद्धतेचें भेसूर स्वरूप बरोबर समजतें! आपल्या बद्धतेची तीव्र संवेदना पाहिजे, तिची तिडिक मस्तकांत गेली पाहिजे, तरच बद्धमुक्त होण्याची उत्कंठा उत्पन्न होईल! आपल्या राष्ट्रीय बंधनाची संवेदना आमच्या पुढाऱ्यांना नाहीं. पत्ते आणि बिलियर्ड खेळण्यांत, चहापार्टी, क्रिकेट आणि टेनिसच्या म्याचेस् पाहण्यांत, रिकामटेकडेपणाच्या गप्पा झोंकण्यांत, पदव्या व मान यासाठीं धडपडण्यांत आणि कनक, कांता व कादंबरी यांच्या प्राप्तीसाठीं

धडपडण्यांत बहुतेक सुशिक्षित गुंग होऊन गेले आहेत ! बद्धतेची जाणीव बहुतेकांना नाहींच; इतकेंच नाहीं, पण उलट गुलामगिरीच्या मदिरापानानें ते धुंद झाले आहेत ! सरकारावर ते कितीही कडक टीका करोत, पण राष्ट्राचें दैन्य, आपल्या राष्ट्राचा उपमर्द, आपल्या राष्ट्राची हीनावस्था याबद्दल त्यांच्या मनात जळजळाट उत्पन्न झालेला दिसत नाही. पृथ्वीवरच्या राष्ट्रांच्या परिषदेंत आपल्या राष्ट्राला दारापाशीं कोणी उभे करीत नाहीं याबद्दल त्यांना लाज वाटत नाही ! राष्ट्राची अब्रू, राष्ट्राचा प्राण, राष्ट्राचा धर्म, राष्ट्राची घटना, यांबद्दल त्यांचें अंतःकरण जळत नाहीं. आपणांला वरिष्ठ दर्जाच्या नोकऱ्या मिळत नाहींत म्हणून मात्र ते रडतात ! एखाद्या पुढाऱ्याला हायकोर्टजजाची जागा मिळाली कीं, आसेतुहिमाचल सर्व लोक आनंदानें टिऱ्या पिटूं लागतात, पण परराज्याच्या वरवटाखालीं जित लोकांतील बुद्धितेज व नैतिकबल नष्ट होत असतें ही गोष्ट ते विसरून जातात. जो पढारी आज सरकारच्या कृत्यांवर कडक टीका करितो, तोच सरकारानें सन्मानाची किंवा मोठ्या पगाराची जागा दिली कीं, सरकारचे गुण गाणारा भाट बनतो ! राष्ट्रीय सभेच्या कांहीं अध्यक्षांना जजांची खुर्ची मिळाल्याबरोबर ते सरकारचे केवळ तोंडपुजे होऊन बसले आहेत ! समर्थांनी म्हटल्याप्रमाणें:—

**तोंवरी तोंवरी परमार्थ स्वयंभ । जंव पोटीं लोभ आला नाहीं**
**तोंवरी तोंवरी धीरत्वाची मात । प्रपंचीं आघात झाला नाहीं**

याप्रकारें 'अवघेच गलाळी दिसतात, व धैर्यवंत बळी विरळाच आढळतो.' ह्या सर्वांचें कारण एवढेंच आहे कीं, राष्ट्रीय बद्धतेची जाणीव—खरें मुमुक्षुत्व—अजून पुढारी म्हणविणारांतही उत्पन्न झालें नाही.

४. भरतखंडांतल्या राजकीय चळवळींचे परिज्ञान ज्याला झालें आहे, त्याच्या हें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं कीं, हें मुमुक्षुत्व, ही बद्धतेची तीव्र जाणीव, राष्ट्रीय मोक्षाची ही तळमळ, राष्ट्रीय पक्षाच्या उत्पत्तीस

कारणीभूत झाली आहे ! हिंदुस्थानाला आपल्या बद्धतेचें ज्ञान होतांक्षणींच त्याच्या फूत्काराबरोबर राष्ट्रीय पक्ष निर्माण झाला आहे ! हिंदुस्थानाच्या मुमुक्षुत्वाची पहिली पताका राष्ट्रीयपक्षाच्या रूपानें फडकूं लागली आहे ! आपल्या स्थितीचें खरें ज्ञान ज्यांना झालें ते राष्ट्रीयपक्षांत सामील झाले आहेत; हें ज्ञान ज्यांना ज्यांना होतें ते ते राष्ट्रीयपक्षाच्या निशाणाखालीं येऊन उभे राहतात. राष्ट्रीयपक्ष दिवसेंदिवस बळावत चालला आहे. त्याच्या शिपायांचा परीघ उत्तरोत्तर विस्तीर्ण होणार आहे. नव्या पिढीचे तरुण वीर हे या पक्षाचे शिपाई आहेत. मुमुक्षुअवस्थेप्रत पोंचलेल्या आर्य-मातेचे हे स्वयंसेवक आहेत. हे तिच्या उन्नतीसाठीं तुरुंगांत जात आहेत, फटके खात आहेत, आर्यमातेच्या मुक्ततेसाठी हे फकीर बनले आहेत.

५. मुमुक्षुत्व म्हणजे मुक्त होण्याची तीव्र इच्छा, बद्धपणांतले पाश खळदिशीं तोडून टाकण्याची उत्कंठा. मुक्त होण्याची इच्छा होतांक्षणींच कोणी मुक्त होतो असें नाहीं. ती इच्छा कितीही प्रबळ असो, मुमुक्षा आणि मुक्तता या दोन अवस्थांमध्यें कांहीं काळ जावा लागतोच. हा काळ अल्प असणें किंवा दीर्घ असणें हें साधनावर किंवा खरें म्हटलें तर मुमु-क्षेच्या तीव्रतेवर अवलंबून आहे. तीव्र मुमुक्षु विहंगममार्गानें जाऊन लवकर मुक्त होतो. हिंदुस्थानाला तीव्र मुमुक्षा झाली आहे कीं नाहीं याचा खुलासा पुढील दहापांच वर्षांतच होईल असें कित्येक दूरदर्शी पुरुष म्हणतात. नव्या पक्षाला मुमुक्षा झाली आहे म्हणून ॲंग्लो-इंडियन पत्र-कार व इंग्रजी अधिकारी त्यावर गुरगुरत आहेत. आम्हांला उपाशी ठेऊन आमच्याच भाकरीवर आमच्या समोर जे चंगळ चालवितात, व उलट आम्हांला वांकुल्या दाखवितात; त्यांना ' आम्ही आपल्या सत्तेची भाकरी पोटभर खाणार ' असें सांगतांच दुःख कां व्हावें बरें ? दुसऱ्याला बुडवावें असा हिंदुस्थानाला इच्छा नाहीं, दुसऱ्याचा घातपात चिंतावा हें हिंदुस्थानचें ब्रीद नाहीं, दुसऱ्याचा नाश करावा यासाठीं हिंदुस्थानची धडपड नाहीं.

हिंदुस्थान स्वहिताला जागृत होत आहे, आजपर्यंत बावळेपणा केला तो त्याला चांगला भोंवला आहे, आतां त्यानें डोळे उघडले आहेत. हिंदुस्थानाला मंद मुमुक्षुत्व उत्पन्न झालें आहे. ती मंदता जाऊन उष्णतेचा पारा चढेल असे यत्न देशभक्तांनीं केले पाहिजेत. ‘ तुमचे अंगांत बिलकूल बकूब नाहीं, तुमच्यांत जूट नाहीं, तुमच्यापाशीं शस्त्रास्त्रें नाहींत, तुम्हाला सैनिक व सेनापति नाहींत, तुमच्यापाशीं द्रव्यबळ नाहीं म्हणून तुम्ही निरंतर असेच दास्यांत कुजत पडा ’ असें कित्येक भारतीयांना सांगून त्यांचे पाय मोडण्याचें मात्र पापकर्म करीत आहेत ! फळाची इच्छा झाल्यावांचून फळ मिळवण्यास अवश्य असणाऱ्या साधनांची जुळवाजुळव तरी कशी व्हावी ? द्रव्यबळ किंवा विद्याबळ प्राप्त व्हावें अशी ज्याला इच्छाच उत्पन्न झाली नाहीं असा मनुष्य द्रव्य किंवा विद्या प्राप्त करून घेण्याच्या मार्गाला कधीं तरी लागेल काय ? आधीं दुर्लभ वस्तूच्या प्राप्तीची इच्छा, नंतर खटपट व नंतर सिद्धी, असा क्रम सर्वत्र दृष्टीस पडतो. हिंदुस्थानाला मुमुक्षुत्व प्राप्त झालें असून राष्ट्रीय पक्षाच्याद्वारें त्याचें अस्तित्व जाणवूं लागलें आहे. स्टेट्समन, पायोनियर, टाइम्स, वगैरे पत्रकारांच्या डोळ्यांत हा वर्ग खुपूं लागला आहे हें साहजिक आहे. यांचा हा आपमतलबीपणा आहे. मोर्लेमिंटोपासून पायोनियरटाईम्सकारांपर्यंत सर्वांचें एक मत आहे, आणि तें हें कीं, हिंदुस्थानाला नित्यदास्यांत जखडून टाकावयाचें ! त्यांचें हित तें पहात असतील. आपलें हित आपणच पाहिलें पाहिजे. मवाळांनीं आंग्लावलंबनाची खोड सोडून दिली पाहिजे. समस्त मवाळबंधूस आमची प्रार्थना आहे कीं, “ तुम्ही येऊन आम्हांला मिळा. तुम्ही आम्ही एक होऊं व ईश्वराच्या प्रसादानें हिंदुस्थानाला प्राप्त झालेल्या मुमुक्षावस्थेंतून त्याला मुक्तावस्थेप्रत नेण्याच्या पवित्र कार्यास एकदिलानें लागूं. नानाविध अडथळे येतील ते अडवणुकीच्या व बहिष्काराच्या मार्गानें उडवून देऊं. भरतभूमीचा माथा—राष्ट्रसेवेंत आपलें पिंड खर्चून—उजळ करूं व जगांतल्या स्वतंत्र राष्ट्रांच्या बरोबरीनें भरतखंडाचा लौकिक वाढवूं. ”

वर्ष २, अंक ५.

———

# ५ रामकृपेचें छत्र.

**शिरीं आहे रामराज । औषधाचें कोण काज ॥ १ ॥**
**जो जो प्रयत्न रामावीण । तो तो दुःखाशीं कारण ॥ २ ॥**
**शंकराचें हळाहळ । जेणें केलें सुशीतळ ॥ ३ ॥**
**आह्मां तोचि तो रक्षिता । रामदासीं नाहीं चिंता ॥ ४ ॥**

१. **परमार्थदृष्टीनें**:—श्रीसमर्थ रामदासस्वामी मुमुक्षूनें भगवंताच्या ठिकाणीं कशी निष्ठा ठेवावी तें या अभंगांत सांगतात. बंधमुक्त होण्यासाठीं मुमुक्षूनें कितीही धडपड केली तरी भगवंत आपल्या शिरावर सदैव जागा आहे; व दयाळूपणानें आपलें अल्पस्वल्प धैर्य पाहून असून सर्व प्रकारचें साहाय्य करण्यास व आपल्याला पुढें नेण्यास तत्पर आहे, अशी त्याची दृढ व शुद्ध भावना असल्याशिवाय ती सारी धडपड फुकट आहे. भवरोगानें आपण पछाडलों आहोंत, व रोगमुक्त व्हावें अशी जर आपली इच्छा आहे तर श्रीतुकाराममहाराजांनीं ह्मटल्याप्रमाणें आपण पथ्य सांभाळलेंच पाहिजे. कामक्रोध हीं मीठमिरचीं सोडावीं, तिचीं रुचीं घेऊं नये; आशा, ममता हे तेलटक पदार्थ टाकावेत, त्यांचा वीट येऊं द्यावा; मद, अहंकार हें ताक दही त्यागावें, त्याचें सेवन करूं नये; दयाक्षमा तूपपोळी सावध राहून पचेल त्या मानानें गिळावी. हें सर्व पथ्य मुमुक्षूला पाहिजेच, पण त्यानें भववैद्य श्रीरामराज हे आपल्या शिरावर आहेत, अशी दृढ श्रद्धा ठेवावी; व चिंतामुक्त होऊन त्यांच्यावर सारा भार सोंपवावा. ही भावना हेंच मुख्य औषध आहे. ही भावना जर नसेल व आपण स्वतंत्रपणें आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर रोगमुक्त होऊं; जप, तप, यज्ञयोग, योगाभ्यास, कर्म, ज्ञान यांच्या आश्रयानें मुक्त होऊं असें वाटत असेल, तर समर्थ ह्मणतातः—" बाबारे ! ही तुझी भ्रांति आहे. कारण आजपर्यंत सर्व संतांचा अनुभव असा आहे कीं, ' जो जो प्रयत्न रामावीण । तो तो दुःखाशीं

कारण. ' प्रयत्न करणें व्यर्थ आहे असें नाहीं, तर सर्व प्रयत्नांला भगवदुपासनेचा आधार नसेल तर ते प्रयत्न व्यर्थ होतात. रामावांचून केलेल्या प्रयत्नांत आराम मिळणार नाहीं व लवकर त्यांचा विराम होईल. प्रयत्नांत विघ्नें येणारच. विघ्नें हीं काळकूटविषासारखीं भयप्रद व प्राणहारक आहेत. त्यांनीं मोठे मोठे गांगरून जातात, पण कसल्याही आघातांतून तरून जाण्याचें सामर्थ्य भगवत्प्रेमानें व श्रद्धेनें येतें. " शंकराचें हळाहळ । जेणें केलें सुशीतळ. " समुद्रमंथनसमयीं देवांचे नायक घाबरले, पण श्रीशंकरांनी तदुत्थ विष प्राशन केलें, व ते रामनाममाहात्म्यानें तरले. श्रीराम दयाळु आहे. ज्यानें शंकराचाही विषदाह शमन केला तो तुला मोकलील असें नाहीं. ह्मणून समर्थ सांगतात " मुमुक्षूनें ही बळकट गांठ मनांत बांधून ठेवावी कीं, श्रीरामपरमात्मा माझें रक्षण करणारा, माझे पाठीमागें उभा राहून माझें ' अल्प धारिष्ट ' कृपाळूपणानें पाहणारा, माझ्या प्रयत्नांत मला सरळ मार्ग दाखविणारा, सर्व विघ्नांतून मला तारून नेणारा समर्थ आहे, त्याच्यापुढें कळिकाळाची मात्रा चालणार नाहीं. त्याच्या पदकमळीं तनुमनधनाची पुष्पांजळी वाहून मी निर्भय व निश्चिंत होणार. मी दीन खरा, पण ईश्वरापुढें, जगापुढें नव्हे. मी ईश्वराचा दत्तक नव्हें, तर औरसपुत्र आहें, व माझी योग्यता सिद्ध झाली कीं, तो आपला निजठेवा मलाच अर्पण करणार आहे. ह्मणून त्यावर सारा भार सोंपवून मी निश्चित होतों. "

२. **काव्यदृष्टीनें**:—सदर अभंगाची रचना मोठी नामी झाली आहे. ' पर्वतो वह्निमान धूमवत्वात् ' या ठरीव न्यायाप्रमाणें यांत प्रथम ' शिरीं आहे रामराज ' हा मुख्य सिद्धांत ठेऊन साऱ्या अभंगांत त्याची सिद्धता केली आहे. ' रामराज शिरीं आहे ' ही भावना न ठेवितां केलेले सारे प्रयत्न निष्फळ आहेत. ह्मणजे ' रामराज शिरीं आहे ' अशी भावना असणें व अशा भावनेनें केलेले सर्व प्रयत्न सफल होणें या गोष्टी नित्य-

सिद्ध आहेत. मात्र उलट सिद्धांत केला तर तो नित्यसिद्ध नाहीं. ज्या ज्या प्रयत्नांत ' राम ' नाहीं ते ते प्रयत्न सफळ होतीलच असें मात्र नाहीं. कधीं सफळ होतील, कधीं न होतील. ह्मणून प्रयत्न निश्चयानें सफल व्हावे अशी इच्छा असेल तर ' रामराज शिरीं आहे ' अशी भावना ठेवा. अशी भावना ठेऊन निश्चयानें सफल कोण झाला ह्मणजे मोठालीं विघ्नें मध्यें येऊनही कोणाचे प्रयत्न सफल झाले ह्मणून विचाराल तर जगद्धितासाठीं हालाहलविषप्राशन करणाऱ्या शंकराचें उदाहरण समर्थांनीं दिलें आहे. शंकरांनीं विष प्राशन केलें असूनही रामराज शिरीं आहे ही भावना जागृत ठेवल्यामुळे त्यांचा प्रयत्न सफल झाला. याप्रमाणें पहिल्या सिद्धांताचें स्पष्टीकरण करून तोच पुन्हां समर्थ शेवटीं भिन्न शब्दांनीं सांगतात कीं, ' आह्मा तोचि तो रक्षिता । रामदासीं नाहीं चिंता. ' तर्कशास्त्राचे नियम डोळ्यांपुढें ठेवून समर्थांनीं हा अभंग केला नाहीं, तथापि विचारी पुरुष सहज हिताच्या गोष्टी सांगू लागले तरी त्या शास्त्रसिद्ध कशा असतात हें वाचकांस कळावें ह्मणून हें लिहिलें आहे. विचारवंतांचे शब्द ह्मणजे विमल मोत्यांचे दाणे आहेत.

३. **राजकीयदृष्टीनें**:—या विवेचनावरून आमचे विचार सहजच स्वदेशाच्या सद्यःस्थितीकडे व देशहितास्तव चाललेल्या आमच्या चळवळींकडे वळले. अलीकडे भरतखंडांत सर्वत्र स्वदेशभक्तीची मोठी स्पृहणीय व उत्साहजनक प्रचंड लाट आलेली दिसते. भगवंताच्या प्रेरणेनेंच स्वदेशी चळवळीसारख्या चळवळी निघाल्या आहेत. आमच्या राष्ट्रीयसभा, औद्योगिक परिषदा, संमेलनें, ग्रंथकारांचीं मंडळें, यात्रोत्सवप्रसंगीं भरणारे मेळे, वर्तमानपत्रें वगैरे अनेक प्रकारच्या चळवळी चालू आहेत. आत्मोद्धारार्थ प्रयत्न तर पाहिजेतच. वेदांत कांहीं असें सांगत नाहीं कीं, तुह्मी सारे हातपाय जोडून स्वस्थ बसा ! कर्मावांचून क्षणभर राहतां येत नाहीं. देहाचीं कर्में खाणें, पिणें, उठणें, बसणें, पोटापाण्याचे व्यवसाय पाहणें हे

जर आमचे सारे व्यवसाय सुरळीत नाहींत ह्मणजे आह्मी कुटुंबप्रपंचा-कडे जर दुर्लक्ष करीत नाहीं, तर आह्मीं राष्ट्रप्रपंचाकडे दुर्लक्ष करणें ईश्वराला कसें आवडेल ? ह्मणून आह्मी राष्ट्रप्रपंच्यासाठीं जे जे प्रयत्न करूं ते ते थोडेच होणार आहेत. आह्मांला बसायला जागा नाहीं, खायला अन्न नाहीं, बोलायला वाचा नाहीं, अशी आज आमची स्थिति झाली आहे. आह्मी डोळे असून आंधळे, कान असून बहिरे, तोंड असून मुके, पाय असून लंगडे झालों आहोंत ! ह्मणून आमच्या सर्व इंद्रियांत तेजस्विता व वीर्य येण्यासाठीं आह्मीं जिवापाड प्रयत्न केलेच पाहिजेत. मात्र हें मनांत निरंतर वागविलें पाहिजे कीं, ' जो जो प्रयत्न रामाविण । तो तो दुःखासीं कारण ' होणार आहे. राष्ट्रीय चळवळी करणाऱ्या पुरुषांच्या अंतःकरणांत खरी खरी धर्मश्रद्धेची व पर-मेश्वरभक्तीची ज्योत पेटली पाहिजे, तरच त्यांच्या वाणींत जिवंतपणा येईल, त्यांच्या अंगांत ईश्वरीतेजाचें वारें खेळूं लागेल, व त्यांची खरी छाप बहुजनसमुदायावर पडेल. आंतून कोरडा राहिल्यावर वाणींत व क्रियेंत ओलावा कोठून येईल ? ओलाव्याचा दंभ नको, जिव्हाळा पाहिजे. जे जे प्रयत्न आपण देशोद्धारार्थ करीत आहोंत ते ते ईश्वराच्या अनुज्ञेनें व त्याच्या कृपाछत्राखालीं करीत आहोंत अशी श्रद्धा पाहिजे, असें अंत-र्यामीं भावलें पाहिजे. आमच्या आज ७५ वर्षांतल्या चळवळी संख्येनें इतक्या पुष्कळ झाल्या आहेत, बुद्धिवंत पुरुषांची मोजदाद केली तर ते इतके झाले आहेत कीं, त्या सर्वांची एक ' डायरेक्टरी ' केली तर भलेमोठें पुस्तक होईल ! पन्नास वर्षांत आमच्या राष्ट्रांत खर्च झालेली बुद्धि व श्रम कांहीं थोडे नाहींत, पण त्यांना यावें तसें व यावें तितकें यश आलें नाहीं. याचें खरें कारण ' शिरीं आहे रामराज ' अशा भावनेचीं, भगवंत अधिष्ठान कायम करून राष्ट्रीय चळवळी करणारीं, कर्तीं माणसें निर्माण झालीं नाहींत हें होय. मनुष्यांनीं प्रयत्न केले कीं सामर्थ्य उत्पन्न होऊन

राष्ट्रकार्य व्हायचेंच. कार्यकर्तृत्व, भगवत्प्रेम, व निरहंकार या तीन गुणांचें सामानाधिकरण्य झालें पाहिजे. सर्वप्रकारच्या तापांपासून मुक्त करणारें केवळ भगवद्दास्य होय. जो भगवद्दास्य करील त्याला परदास्यांत रखडावें लागणार नाहीं. पंत ह्मणतातः—

**सोडविते भवपाशापासुनि निजदास्य सादरा जीवा ।**
**ह्मणवुनि मुमुक्षु भावें विनविति तुझियाचि पादराजीवा ॥१॥**

वर्ष १, अंक १.

---

## ६ यज्ञ.

धुळ्यास लवकरच यज्ञ होणार आहे. आमच्या धर्मांत यज्ञकर्माचें महत्त्व फार सांगितलें आहे. यज्ञ अनेक प्रकारचा आहे. द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, वाग्यज्ञ, ज्ञानयज्ञ, आत्मयज्ञ वगैरे कर्माधिक श्रेयस्कर असे अनेक यज्ञ आहेत. मनुष्यप्राण्यानें जन्मास आल्यासारखें एक किंवा अधिक यज्ञ केल्याशिवाय राहूं नये! ज्याच्या जन्मांत यज्ञकर्म नाहीं तो मनुष्य कसचा द्रव्ययज्ञापेक्षां अर्थात् ज्ञानयज्ञ श्रेयस्कर आहे, व आत्मयज्ञासारखा पुण्यकारक कोणताही यज्ञ नाहीं; तथापि यज्ञोपासना योग्यतेप्रमाणें करीत असावी. सर्वाभूतीं देव पाहण्याइतका अधिकार ज्याला आला नाहीं, त्यानें मूर्तीमध्येंच प्रथम देव पाहण्यास शिकलें पाहिजे; त्याप्रमाणेंच 'आत्मयज्ञ' करण्याचा अधिकार ज्याला प्राप्त झाला नाहीं, त्यानें द्रव्ययज्ञच केला पाहिजे. विश्वात्मक देवाची उपासना यज्ञाशिवाय होणार नाहीं. आपला देह, आपलीं इंद्रियें, आपला प्राण, आपले स्त्रीपुत्र, आपलें घरदार यांच्याच उपासनेंत जीवाचे जन्म जात आहेत, तेव्हां यांपैकीं कांहीं पदार्थांचा यज्ञ करावयाचा अभ्यास केला पाहिजे! भगवत्प्राप्तीसाठीं देहाचा, इंद्रियांचा, प्राणांचा, स्त्री-

पुत्रांचा, घरादारांचा यज्ञ करण्यास शिकलें पाहिजे. अत्यंत प्रिय वस्तूंचा भगवत्प्रीत्यर्थ त्याग करणे हाच यज्ञ होय. भगवंताची प्राप्ति किंवा प्रीति हेंच आपलें परम साध्य समजून त्यासाठी देहबुद्धीमुळे प्रिय वाटणाऱ्या पदार्थांचा त्याग करणे हाच खरा यज्ञ होय अहंकारानें आपणास ग्रासिलें आहे म्हणून अहंकाररूपी बोकड ठार मारणें व तो मारतांना अपमानादिकांच्या ज्या यातना होतील त्या संतोषानें सोसणें हा यज्ञच आहे. प्रत्यक्ष बोकड मारणें हें उपलक्षण आहे एका गरीब प्राण्याचा वध करून आपण मुक्त होतों असें थोडेंच आहे? प्राचीनकाळी भरतखंडांत मोठमोठे यज्ञयाग होत असत, पण तो काळ आता गेला. यज्ञकर्मांत पशुरूप द्रव्याचा यज्ञ करीत असतील, नाहीं असें नाहीं. पशुवधात्मक यज्ञकर्म करण्याचा अधिकार श्रुतिस्मृतींनीं आपणास दिला आहे किंवा नाहीं याचा विचार येथें कर्तव्य नाहीं. येथें होणाऱ्या यज्ञांत पशुवध करूं नये अशी आमची वे. दीक्षितांस नम्र प्रार्थना आहे 'यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते' या वचनाप्रमाणे कोणी ही स्वर्गप्राप्त्यर्थ खुशाल यज्ञ करावा, व स्वर्गांत दिव्य देवभोग भोगावेत, त्याबद्दल आमचें कांहीं म्हणणें नाहीं. असा यज्ञ करणारे पुरुष क्षीणपुण्य होतांच परत मृत्युलोकांत येतात व जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पडतात, असें भगवंतांनीं सांगितलें आहे. अनन्यभक्तीनें 'दारा-सुत-गृह-प्राण' भगवंतास अर्पण करणे, स्वतः मुक्त होणें व भगवत्प्रीत्यर्थ परोपकारार्थ त्यांचा वेंच करणे हा परमपुण्यकारक यज्ञ होय. प्रस्तुत प्रसंगीं आह्मांस एवढेंच सुचवायचें आहे कीं, प्राचीनकाळी यज्ञप्रसंगीं जरी पशुवध होत असले, तरी अर्वाचीन काळच्या धर्मप्रवर्तकांनीं जें सांगितलें आहे त्याच्या अनुरोधानें वागणें हें सर्वही वर्णातल्या सत्पुरुषांचें आद्यकर्तव्य आहे. 'धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां' असें धर्मव्यासांचें वचन आहे. वेदवचनांचा भावार्थ कोणास कळतो? तेव्हां प्रत्येक काळांत जे अवतारी धर्मपुरुष होतात त्यांचें वचन प्रमाण मानणें हेंच कल्याणकर आहे. यज्ञांत पशुवध करूं नये तर आलंभन-

विधि करावा, ह्मणजे देवतोद्देशानें पशूचें अंगस्पर्शन करून त्यास सोडून द्यावें, किंवा पिठाचा पशु करून त्याचें हवन करावें, पण हिंसा करूं नये अशी आमची येथील दीक्षितांस नम्रतेची प्रार्थना आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज ह्मणजे केवळ विष्णूचा अवतार होत. त्यांनीं ज्ञानेश्वरींत स्पष्ट सांगितलें आहे ( अध्याय ९ ) :—

**ऐसे दीक्षित जे सोमप। जे आपणचि यज्ञाचें स्वरूप॥**
**तिहीं तया पुण्याचेनि नांवें पाप। जोडिलें देखें॥ ३०९॥**
**म्हणजे वेतां पै सुभटां। या द्विविधा गा आव्हांटा॥**
**स्वर्ग नरक या वाटा। चोरांचिया॥ ३१०॥**
**स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे। पापात्मकें पापें नरका जाइजे॥**
**मग मातें जेणें पाविजे। तें शुद्ध पुण्य॥ ३१६॥**

तसेंच महाराज तेराव्या अध्यायांत पुन: ह्मणतात :—

**पेरिजे तुरुची हिंसा। तेथ उगवेल काय अहिंसा?॥**
**परी नवल बापा धिवसा। या याज्ञिकांचा!॥ २२४॥**

पैठणकर कर्मनिष्ठ ब्राह्मणांच्या पुढ्यांत वाढलेले, खरे वेदशास्त्रसंपन्न व श्रुतिस्मृतिरहस्य जाणणारे श्रीएकनाथ महाराज ह्मणतात:—

**निष्कामकामासी जाण। स्वधर्मार्थ करावे यज्ञ॥**
**तेथें पशूचें आलभन। सर्वथा हनन करूं नये २६४॥**
**पशूचें करूं नये हनन। देवतोद्देशें अंगस्पर्शन॥**
**या नांव बोलिजे आलभन। हें यज्ञाचरण निष्काम।२६५**

केवळ मांसभक्षणासाठीं पशुघात केला तर मात्र हिंसादोष येतो असें दीक्षितांचें मत आहे, पण यावर नाथांचें उत्तर असें आहे:—

**देवतोद्देशें पशुघात। तेणें स्वर्ग होय प्राप्त॥**
**तोही भोगक्षयें क्षया जात। तेणें हिंसा प्राप्त याज्ञिकां॥ २७॥**
**एवं जेथें पशुहनन। तें कर्म सदोष पूर्ण॥**
**यालागीं तेथें अधःपतन। बोलिलें जाण याज्ञिकांसीं॥२७३॥**

एकनाथी–भागवत, अ. ५.

नाथांनीं ज्या मूळ भागवती श्लोकांवर व्याख्यान केलें आहे ते श्लोक म्हणजे ५ व्या अध्यायांतले श्लोक ११।१२ यांकडेही दीक्षितांनीं लक्ष पोंचवावें. 'तथा पशोरालभनं न हिंसा' हाच शुद्ध स्वधर्म आहे असें भागवतकारांचें स्पष्ट सांगणें आहे. गीता व भागवत हे ग्रंथ व ज्ञानेश्वर व एकनाथ हे पुरुष यांना पूज्य मानावयाचें असेल तर यज्ञांत पशुवध विहित नाहीं असेंच निश्चित होतें. वर्ष १ अंक २.

---

## ७ पुढारी कसा पाहिजे ?

आपल्या पुराणांतल्या पवित्र कथा वाचून किंवा ऐकून धर्मबुद्धीची वाढ होतेच, पण त्यांतही राजकीय किंवा व्यावहारिक विषयांचें शिक्षण घेण्यासही पुष्कळ अवसर सांपडतो. किंबहुना आमचीं पुराणें भगवत्प्रेम, राजकारण व व्यवहार या तिहींचें शिक्षण एकसमयावच्छेदेंकरून देत असतात, व आमचे राष्ट्रीय कवि व संत हीं सर्व धोरणें संभाळून काव्यरचना करीत असतात. एकाच कथेचें मर्म भिन्नभिन्न व्यक्तींना आपापल्या अधिकाराप्रमाणें किंवा परिस्थितीप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेनें समजतें. श्रीज्ञानोबारायांच्या दृष्टांतांनीं बोलायचें म्हणजे सूर्योदयाबरोबर सर्वच मार्ग प्रकाशित होतात, पण प्रवासी ज्याप्रमाणें त्यांपैकीं आपल्याला पाहिजे तो एकच मार्ग धरितो, किंवा सारें महीतळ जळमय झालें तरी आपल्या जवळच्या खोंदांत मावेल

इतकेंच किंवा तृषा असेल इतकेंच जल घेतो, त्याप्रमाणें एकाच पुराण-कथेंतून अनेक रहस्यें निघतात, पण जो तो आपल्या योग्यतेनुरूप किंवा प्रसंगानुसार त्यांतलें एकच रहस्य एका वेळीं घेतो. श्रीमद्भागवताच्या आठव्या स्कंधांत समुद्रमंथनाची कथा दिली आहे ती व त्या प्रसंगावरील मोरोपंतांची आर्या पाहून अगर्दी सदर कथेंत आमच्या लोकनायकांनीं शिकण्या-सारखें जें एक सुंदर तत्त्व आम्हांस आढळलें, त्यासंबंधानें आज दोन शब्द आम्ही लिहिणार आहोंत.

देवदानवांनीं समुद्रमंथन केलें तेव्हां त्यांतून हालाहल विष निघालें; तें जगत्कल्याणार्थ शंकरांनीं प्राशन केलें, व त्यामुळे त्यांच्या अंगाचा दाह होऊं लागला, तेव्हां त्यांनीं रामनाम कंठीं धरिलें व त्यांचा दाह शमला, ही कथा आबालवृद्धांस माहीत आहेच. हालाहल विष काळेंकुट्ट होतें. तें जगाला जाळीत सुटलें तेव्हां सर्व प्राणी घाबरले. तेव्हां:—

**तत्काळचि करुणार्णव देव वतंसीकृतेंदुकळ वळला।**
**तें विश्वप्राणहर व्यसन विलोकूनि फार कळवळला ॥ १ ॥**

खरे दयाळू असतात ते असेच परदुःख पाहून कळवळतात. 'दया तिचें नांव भूतांचें पाळण.' विश्वाचे प्राण हरण करणारें संकट पाहून शंकर कळवळले. आपलें राष्ट्र, आपला समाज, आपले स्वजन प्राणसंकटांत पडलेले पाहून ज्याचें मन कळवळतें तोच खरा लोकनायक होय. संकटांपासून लोकनायकाला ताप होत नाहीं काय? होतात. पण त्याचें मन चंद्राप्रमाणें शांत व गंभीर असतें. आपण सत्कार्य करीत आहोंत, दुसऱ्याचे क्लेश नाहींसे करण्याचें पुण्यकर्म करीत आहोंत, असा त्याला भरंवसा असतो, व यामुळें त्याचें चित्त क्षुब्ध होत नाहीं. मनाची देवता आहे चंद्र. शंकरांनीं जगदुप-कारार्थ विष भक्षण केलें, तेव्हां त्यांनीं चंद्राला अवतंस म्हणजे शिरोभूषण केलें. जगताला किंवा राष्ट्राला ताप देणारें संकट जो लोकनायक आपण होऊन

आपल्यावर ओढून घेतो, त्याचें मन शीतल, प्रसन्न व आनंदरूप असायला पाहिजे. शंकराला ( कल्याणकराला ) वतंसीकृतेंदुकळ ( शिरोभूषण केली आहे चंद्रकला ज्यानें ) असें विशेषण पंतांनीं दिलें तें साभिप्राय आहे. यावरून विषभक्षणामुळें होणाऱ्या तापावर एक मारक औषध त्यांजपाशीं होतें किंवा त्यांनीं जवळ केलें होतें असें स्पष्ट होतें. राष्ट्राचें संकट पाहून ज्याचें चित्त कळवळत असेल त्यानेंही असेंच एक औषध जवळ केलें पाहिजे. शंकरानें ज्याप्रमाणें चंद्र मस्तकावर धारण केला, त्याप्रमाणें लोकनायकानें आपलें मन शांत व खंबीर ठेवलें पाहिजे. एवढयानेंच भागत नाहीं. जगत्कल्याणार्थ जें विष घ्यावयाचें तें दुःखाकष्टानें घेऊन उपयोगी नाहीं. तें स्वसंतोषानें खुषीनें घेतलें तरच त्याची किंमत आहे. शंकर पार्वतीला ह्मणतात:—

**जग जगदीश्वरि, वांचो, त्वदधरमधुसेंचि सेवितों विष मी।**
**तो आप्तोत्तम, कामा ये जो धांवोनि अवसरीं विषमीं ॥ १ ॥**

मी विष भक्षण करितों, माझें काय व्हावयाचें असेल तें होवो; तें तुझ्या अधरामृताप्रमाणेंच मी संतोषानें सेवितों. त्याबद्दल मला यत्किंचितही खेद होत नाहीं. देवांनीं आतांपर्यंत माझी पूजा केली, माझा मान ठेविला, माझ्यावर पुष्पवृष्टि केली, मला आपल्यांत श्रेष्ठपद दिलें, मला आप्तोत्तम ह्मटलें आणि मी कठिणप्रसंगीं त्यांच्या मदतीस धांवणार नाहीं तर काय उपयोग ? जो कठिण प्रसंग येतांच धांवून येतो त्यालाच आप्तोत्तम ह्मणावें. लोकनायक ज्याला व्हावयाचें असेल त्यानें हें लक्षांत बाळगिलें पाहिजे. आपल्या लोकांचें कल्याण करायची त्याला खरी बुद्धि असेल तर त्यानें आपणांवर येईल तें संकट आनंदानें सोसायला तंग बांधला पाहिजे. लोकसेवा करणें सोपें नाहीं. राष्ट्रावर येणारें संकट स्वतःवर एकट्यावर ओढून घेतलें पाहिजे, त्याला आपल्या सर्वस्वावर लाथ मारिली पाहिजे, तोफेच्या गोळ्यासमोर आपली छाती निर्धास्तपणानें, निर्भयपणानें व आनंदानें उघडी करून ठेवण्याची तयारी पाहिजे, स्वस्त्रीचें अधरामृतपान करितांना ह्मणजे संसारसौख्य भोगतांना जी मनाची

भूमि असेल, तीच अशा प्रसंगीं कायम ठेवतां आली पाहिजे. 'हिरा ठेवितो ऐरणीं। वांचे मारितां जो घणीं!' लोकसेवा सुळावरील पोळी आहे. सध्यां भरतखंडांत अशा राष्ट्रकल्याण करणाऱ्या राष्ट्रभक्तांची फार जरूर आहे. पुढें ठेवलेलें पाऊल मागें घ्यायचें नाहीं अशा निकराचे राष्ट्रभक्त पाहिजेत. आमच्या लोकांचें संकट पाहून त्यांचें चित्त कळवळलें पाहिजे. वरची बेगडी राष्ट्रभक्ति काय कामाची? वाऱ्याची झुळूक आल्याबरोबर उडून जाणाऱ्या राष्ट्रभक्तांचा काय उपयोग? आपत्तींचीं वावटळें उठलीं तरी त्यांतून अभंग राहणारी, न ढळणारी, राष्ट्रभक्ति पाहिजे. लोकांच्या आपत्तीची आंच अंतःकरणाला लागली पाहिजे. हजारों लोकांना पोटभर खायला मिळत नाहीं, जाडाभरडा कपडा अंगावर घालायला नाहीं, बाराबारा वर्षे रक्त ओकून विद्या संपादिली तरी पोटाची मागची काळजी सुटत नाहीं, वर्षभर शेतांत काबाडकष्ट केले तरी सरकारसारा व सावकाराचें कर्ज फेडून एकेवळ पोटभर अन्न मिळण्याची चांगल्या शेतकऱ्याला सुद्धां मारामार पडूं लागली आहे, अशी सर्व देशाची अन्नान्नदशा झाली आहे! धर्मबंधनें शिथिल होऊन अंतस्तेज व अंतःसमाधान हीं कोठें आढळत नाहींत. नेहमींचे त्रिविध ताप व चौथा परक्या सरकारचा ताप अशा चतुर्विध तापांनी सारें राष्ट्र गांजून गेलें आहे, हे पाहून ज्याला रात्रंदिवस झोंप येत नाहीं, अन्न गोड लागत नाहीं, असे कळवळ्याचे राष्ट्रभक्त पाहिजेत. ईश्वरा! असे तेजस्वी, बाणेदार, कळकळीचे, निरपेक्ष राष्ट्रभक्त या भरतखंडाला दे. श्रीशंकरा! देवांचा कळवळा आपणाला आला, मग दीनदुबळ्या, त्रस्त झालेल्या भारतीयांचा कळवळा आपणांस कां येत नाहीं? आपण एक वेळ भरतखंडाकडे पहा. आमची विपन्नावस्था पाहून आपलें चित्त कळवळेल. दारिद्र्य, प्लेग व यांच्याच सारखे शरीराचे, मनाचे, प्राणाचे लचके तोडणारे जे जे आमचे प्राणहर असतील त्यांच्यापासून आमचे रक्षण करून आम्हांस सुखी कर! वर्ष १, अंक ७.

# ८ आत्मतृप्ताचे ढेकर.

पंतांचे समकालीन महाराष्ट्रकवि निरंजन माधव हे मोठे राजयोगी व भगवद्भक्त होते. त्यांच्या कवितेचीं बाडें चाळीत असतां पुढील गोड स्फुटें आम्हांस आढळलीं, तीं आम्हीं आमच्या वाचकांस अर्पण करितों.

अद्वैतबोध घडला बरवा मनाला ।
तो काय मी कथिन बाह्यमुखी जनाला ?
विश्वास ज्यासी न बसे गुरुतत्वबोधीं ।
चिद्वस्तु जें परम त्याप्रति कोण बोधी ? ॥ १ ॥

श्रीसज्जनांघ्रिकमळीं नत जो घडेना ।
त्याला कदापि गुरुतत्व दिठीं पडेना ! ॥
जो साधुसंग धरी त्यासचि लाभ होतो, ।
चित्सार सेवुनि निरंतर तृप्त हो तो ! ॥ २ ॥

अतितर परमार्थीं वेधलें चित्त ज्याचें ।
तरिच सफल झालें जन्म या मानवाचें ॥
त्यजुनि सकळ दृश्याभास आत्माचि डोळां ।
निरखिल तरि जीवन्मुक्त तो साच झाला ॥ ३ ॥

—निरंजन माधव.

वर्ष १, अंक ३.

---

# १ घंटा.

**आगमार्थं तु देवानां गमनार्थं तु रक्षसाम्।**
**कुरु घंटे रवं तत्र देवताव्हानलक्षणम् ॥ १ ॥**

१. आपण देवपूजाप्रसंगीं घंटेची पूजा करून घंटानाद करितों, देवताह्वान करून तिची उपासना करितों, व देवतेचा प्रसाद मागून घेऊन तिची हृदयांत स्थापना करून नंतर विसर्जन करितों, हें सर्वास माहीत आहेच. देवतेचें वास्तव्य वस्तुतः हृदयांतच आहे, ईश्वर जीवांच्या हृदयांत आहे. भक्तिभावानें उद्दीपन करून हृदयकमललिंगाची उपासना करणें हीच खरी देवपूजा आहे ! पण अंतःस्थ परमात्म्याची मानसिक पूजा करितां येत नाहीं म्हणून बाह्यलक्षणें अवश्य आहेत. भगवंताची सगुण मूर्ति पुढें पाहिजे, तिचें यथाविधि पूजन केलें पाहिजे, धूपदीपगंधाक्षता नैवेद्य वगैरे सर्व यथासांग केलें पाहिजे. कर्ममार्गाची फार जरूरी आहे. त्याचा उच्छेद जाणत्यालाही करणें योग्य नाहीं, नेणत्याचें त्यावांचून पाऊलच पुढें पडणार नाहीं. पण कर्म करितांना हृदयांत भगवद्भक्तीचा ओलावा पाहिजे. अंतर्वृत्ति भगवत्प्रेमानें निरंतर आर्द्र करीत असावी. प्रेमवृत्तीची ओपासना प्रत्येकानें करावी. आपल्या शास्त्रांत सांगितलेलीं व सुजनांनीं आचारांत आणलेलीं सर्व कर्में भगवत्प्रीतिसाठींच करावयाचीं असतात. अभिषेकपात्रांत वारंवार गंगाजल घालीत असतांना व अभिषेकाचे मंत्र पुरुषसूक्त, पवमान, रुद्र वगैरे म्हणत असतांना ' प्रेम अमृताची धार। वाहे देवाही समोर '. ही भावना निरंतर ठेवावी ! आपली आचारपद्धती फारच उत्कृष्ट आहे. असो. आज ' घंटानादा ' ची थोडीशी महती सांगावयाची आहे.

२. प्रत्येकाच्या घरीं देव्हाऱ्यांत ' घंटा ' असतेच, तिला गंध पुष्प वाहून तिची पूजाअर्चाही सर्वजण करीतच असतात, व ती प्रथम वाज-

वितांना ' आगमार्थं ' हा मंत्रही सर्वजण ह्मणतात. पण देवपूजाप्रसंगीं घंटा वाजवितांना जी भावना पाहिजे असते तिच्या आराधनेकडे सर्वांचें लक्ष असतेंच असें नाहीं. तें जावें ह्मणून हा लेख लिहिण्याचें आज आह्मीं मनांत आणलें आहे.

२. घंटेच्या आकारावरूनही आपणांस समजून येईल कीं, घंटा ही तोंडाचें अगर जिव्हेचें एक उपलक्षण आहे. घंटेच्या मध्यें जशी एक लोळी असते, तशीच आपली जिव्हा ही तोंडामध्यें मागेंपुढें वळवळ करीत असते. आपल्या बोलण्याचालण्यांतही जिव्हा व घंटा यांचा परस्परसंबंध आहे असें आपण दाखवीत असतों. एखादा मनुष्य फार बडबड्या असला कीं ' ही घंटा आली ' असें आपण पुष्कळदां विनोदानें ह्मणतों— नाशीक येथें गोदातीरीं पेशवाईतले प्रसिद्ध वीर नारो शंकर यांनीं एक शंकराचें देऊळ बांधलें आहे. त्या देवळावर एक मली भक्कम अजस्र घंटा बांधली आहे. तिला ' नारो शंकरी ' घांट ह्मणतात; ती एवढी मोठी आहे कीं, तिचा लोळा मागें पुढें हलवायला थोडेसे श्रमच घ्यावे लागतात ! त्या घंटेवरून एखादा कर्कश व मोठ्या स्वरानें बोलणारा व आपल्या बोलण्यानें लोकांच्या कानठाळ्या बसविणारा बहुभाष असला कीं, त्याला ' नारोशंकरी घांट ' असें थट्टेनें ह्मणण्याचा प्रघातही पडला आहे ! इंग्लंडांत एडमंड बर्क नामक प्रसिद्ध मुत्सद्दी व वक्ता होऊन गेला. तो ठिकठिकाणची माहिती मोठ्या परिश्रमानें मिळवून आणी व पार्लमेंट सभेंत बोलूं लागला कीं, कागदपत्रांचीं पुडक्यांच्या पुडकीं खिशांतून काढी. बर्कची माहिती विलक्षण, वक्तृत्व लोकोत्तर व आवाज खणखणीत, यामुळें स्वारी एखाद्या विषयावर बोलूं लागली कीं, तासचे तास सारखी बोलत उभी राहायची ! त्यामुळें शेवटीं शेवटीं त्याच्या भाषणप्रसंगीं अखेरपर्यंत बसण्याचा धीर बहुतेकांस नसल्यामुळें एकामागून एक मंडळी पार्लमेंटसभास्थान सोडून चालती व्हावयाची.

एडमंड बर्क बोलायला उठला कीं, ही " जेवायला जायची घंटा " वाजली असें पुढें लोक ह्मणूं लागले !

४. घंटा ह्मणजे वस्तुतः आपली रसना किंवा जिव्हा होय. लोखंडाची, पितळेची, किंवा चांदीची घंटा हजार वर्षे कोट वेळ नुस्ती भक्तिभावाशिवाय वाजवीत राहिल्यानें देवतेची प्राप्ति थोडीच होणार आहे ! देवांचे आगमन व्हावें, राक्षसांनीं गमन करावें, व इष्ट देवतेचा साक्षात्कार व्हावा, अशी ज्याची मनापासून इच्छा असेल, त्यानें रसनारूपी घंटा निर्लज्जपणानें पण प्रेमभरानें निरंतर वाजवीत राहिलें पाहिजे ! ज्ञानोबारायांनीं सांगितलेंच आहे:—

**न सोडीं रे भावो टाकीं रे संदेहो ।**
**रामकृष्णीं टाहो नित्य फोडीं ॥ १ ॥**

रामकृष्णनामाचा निरंतर टाहो फोडणें ह्मणजेच घंटा वाजविणें होय. ही घंटा वाजूं लागली, रामकृष्णनामाचा नाद देवघरांत किंवा मंदिरांत सारखा घुमूं लागला, ह्मणजे देवाचें आगमन होतें, व राक्षस दूर पळून जातात. दान, दम, शम, स्वाध्याय, तप, आर्जव, अक्रोध सत्य, त्याग, मार्दव, तेज, क्षमा, धृति, शौच, वगैरे दैवी संपत्तीचे गुण, सात्विक अष्टभाव, सत्वविकार इत्यादि सर्व जे देव आहेत, त्यांचा हृदयमंदिरांत आविर्भाव होतो; व देवांचा आविर्भाव होऊं लागला कीं दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, अज्ञान, नास्तिकपणा, देहाहंकार, काम, लोभ, मोह वगैरे सर्व राक्षस आपापल्या परिवारांसह तात्काळ दूर होतात ! देव आणि दैत्य, सद्विकार आणि असद्विकार, सद्वृत्ति आणि असद्वृत्ति यांचें हाडवैर पुराणप्रसिद्ध आहे. प्रकाश आणि अंधार याप्रमाणें त्यांचा एकत्रवास होणें शक्य नाहीं. असद्वृत्ति नष्ट व्हाव्यात व सद्वृत्तींचा विकास व्हावा असें प्रत्येक मुमुक्षूस वाटत असतें, व ज्याला ज्याला असें वाटतें तो तो घंटा बडवूं लागतो. घंटेचा आवाज जितका

मोठा तितक्या या वृत्ति खडबडून जाग्या होतात, म्हणूनच ज्ञानोबारायांनीं ‘ रामकृष्णीं टाहो नित्य फोडीं ’ म्हणून सांगितलें आहे. रामकृष्णनामाचा जयघोष सुरू झाला कीं, राक्षस क्षणभरही तेथें राहणार नाहींत ! देवांचे समुदाय तेथें जमतील. या घंटेचा नाद देवांना अत्यंत प्रिय आहे. घंटानादानें देवांचें आगमन झालें कीं, सर्व देव इष्ट देवतेपाशीं भजकाची वकीली करितात, व मग त्या देवतेला साक्षात् प्रकट व्हावें लागतें ! ज्या भावानें, ज्या स्वरूपानें, परमेश्वराला आळवावें, त्या स्वरूपानें तो प्रकट होतो. इष्टदेवता कोणतीही असो, ‘ सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ’ हेंच सर्वथैव खरें आहे. पंढरपुरासारख्या क्षेत्राच्या ठिकाणीं हजारों मनुष्यांच्या तोंडांतील घंटा विठ्ठल नामाचा जेव्हां गरजून जयघोष करितात, तेव्हां सर्व त्रिभुवनांतले देव त्या ठिकाणीं प्राप्त होतात ; व तेही आनंदभरानें भगवन्नाम गावू लागतात, मग त्या देवांच्या मेळांत सर्व व्यापी सच्चिदानंद परमात्मा साक्षात् प्रकट होतो, यदर्थीं संशय नाहीं. संशय बाळगील तो निखालस पतित समजावा.

५. अशा या घंटेचा नित्य नाद करावा. हा कोणीही, केव्हांही, कोठेंही केला तरी चालतो. नामदेव म्हणतात:–

काळवेळ नसे नामसंकीर्तनीं ।
उंचनीच योनी हें ही नसे ॥ १ ॥
धरा नाम कंठीं सर्वासर्वकाळ ।
मग तो गोपाळ सांभाळील ॥ २ ॥
कृपाळु कोंवळा सुखाचा सागर ।
करील उद्धार भाविकांसी ॥ ३ ॥
नामा म्हणे फार सोपें हें साधन ।
वाचे नाम घेणें हतुकेंची ॥ ४ ॥

६. ईश्वरप्राप्ति करून देणारी ही आपल्या तोंडांतली घंटा पूजार्ह आहे हें यावरून ठरतें. म्हणूनच मोठमोठ्या साधुसंतांनीं आपल्या रसनारूपी घंटेची विनवणी केली आहे कीं, ' बाईगे ! बेडूक किंवा कुत्रा जसा व्यर्थ ओरडत रहातो, तशी तूं सकाळपासून संध्याकाळपर्यंत प्रपंच्यांतल्या वायफळ गोष्टी बोलण्यांतच आपला काळ घालवूं नकोस, तर भगवन्नामस्मरणांत रम, तेथेंच स्थिर हो, म्हणजे तुझ्या जन्माचें व आमच्याहि जन्माचें सार्थक होईल.' श्री समर्थ रामदास म्हणतात:—

**जिव्हे ! रसने ! जठरार्थ कैसी । नृत्यांगना होउनि नाचतेसी।**
**वृथा च तूं वो श्रम पावतेसी।यालागिं भावें जप राघवासी॥१**

वामन पंडित म्हणतात :—

**हे रसने ! तुज वीनवितों कर जोडुनि एक विनंति करी।**
**सर्व अमान्य जगत्त्रयदुर्गुण काढुनि होउं नको अखरी।**
**मौन्यरूपें कमु काळ कसा म्हणसी तरि निश्चळ ध्यान धरी।**
**श्रीशिव शंभुदयार्णव केशव माधव कृष्ण मुकुंद हरी॥**

७. रसनेची प्रार्थना संतांनीं परोपरीनें केली आहे, तीच प्रार्थना त्यांच्याच शब्दांनीं आपण आपल्या जिव्हेस वारंवार करीत असावी. सांसारिक गोष्टींची चर्चा करण्यांत आपले जन्मचे जन्म फुकट जात आहेत, याची खंत बाळगून मुखानें नामस्मरण करीत असावें, म्हणजे मोक्ष कांहीं दूर नाहीं. तुकोबा म्हणतात:—

**मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांसी॥१॥**

अथवा हा दुसऱ्यांचा दिलेला हवाला कोणाला पटत नसेल तर:—

**तुका म्हणे रामनामीं। कृतकृत्य झालों आम्हीं॥१॥**

८. असो. पूजाअर्चा करीत असतांनाच काय, पण जेव्हां जेव्हां वेळ सांपडेल, तेव्हां तेव्हां आपली जिव्हारूप घंटा जर भगवन्नामाचा साद घालीत राहील तर हृदयमंदिरांत सद्वृत्तिरूप देव येऊन निरंतर वास्तव्य करितील, असद्वृत्तिरूप राक्षस आसपास सुद्धां फिरकणार नाहींत व आराध्यदेवतेचा नित्य साक्षात्कार होऊन जीव कृतार्थ होईल. निरंतर घंटानादानें भगवान् प्रसन्न झाल्यावरः—

**सांठविला हरी। जेणें हृदयमंदिरीं॥ १॥**

**त्याची चुकली येरझार। झाला सफळ व्यापार॥२॥**

वर्ष १, अंक ९.

---

# १० होळी.

**होळीमध्यें साजें आहे। तें तूं विचारूनि पाहे॥ १॥**

—श्रीरामदास.

पुढील आठवड्यांत शिमग्याचा सण आला आहे. हा सण आपल्या समाजांत निदान दोन हजार वर्षांचा जुना आहे. गाथासप्तशती नांवाचा एक प्राकृत भाषेतला ग्रंथ शालिवाहन शकाच्या प्रारंभींच लिहिला आहे, त्यांत 'फाल्गुनोत्सव' व 'धुळवड' यांबद्दल स्पष्ट उल्लेख आहेत. 'कलौ वेदांतिनो भांति फाल्गुने बालका इव' हें वचन प्रसिद्धच आहे, व यावरून शिमग्यांत बोंबलण्याची चाल फार जुनी आहे असें दिसतें! दोन हजार वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत जो शिमग्याचा सण होत असे, त्यांत मर्दानीपणा ज्यास्त असे. पुरुषांना स्त्रियांचीं सोंगें देण्याची तेव्हां चाल नव्हती. कलावंतिणीच विलासी जनांच्या मनोरंजनाचें काम करीत असत. रंगपंचमीच्या दिवशीं रंग खेळण्याची

चालू तर रजपुतान्यांतून महादजी शिंदे यांनीं दक्षिणेंत आणली ह्मणून ह्मणतात. सवाईमाधवराव रंग खेळले त्यावेळचा पोवाडा आपल्या इकडे कुलीन स्त्रियांनासुद्धां पाठ असतो. अलीकडे या सणांतला पुष्कळ अश्लीलपणा कमी होत चालला आहे, हें सुचिन्ह आहे.

श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं ' होळीपंचक ' ह्मणून एक प्रकरण केलेलें बहुतांच्या पाहण्यांत असेल. पूर्णिमेचा दिवस मुख्य होय. त्या दिवशीं होळी पेटवून तिच्यांत खोबरें टाकायचें व होळीला प्रदक्षिणा घालून योनिद्वाराचा उच्चार करून बोंब ठोकायची हा मुख्य विधि आहे. ह्या विधीचें रहस्य समर्थ सांगतातः--

[ १ ]

अवघेचि बोंबलती । होळीभोंवते भोंवतीं ॥ १ ॥
मायाहोळी प्रज्वळली । सृष्टिपेटारें लाविली ॥ २ ॥
ज्या कारणें गुंडाळिती । तेंचि वाचें उच्चारिती ॥ ३ ॥
होळीमध्यें खाजें आहे । तें तू विचारूनी पाहे ॥ ४ ॥
खाजें खातां सुख होये । परि तें कठिण होतां नये ॥५॥
खोल दृष्टीनें पाहिलें । खाजें त्याच्या हातां आलें ॥ ६ ॥
एक आपणचि खाती । एक सकळांतें वाटिती ॥ ७ ॥
रामीं रामदास होळी । केली संसाराची धुळी ॥ ८ ॥

[ २ ]

अजूनि कायरे दुश्चिता । सावधान होईं आतां ॥ १ ॥
मागवीलें योनिद्वारें । ह्मणोनि बोंबलतीं पोरें ॥ २ ॥
धुळी टाकिती मस्तकीं । कोणी वाव घेईना कीं ॥ ३ ॥
रांडीऐसे नर्क होती । ह्मणोनि प्रत्यक्ष दाविती ॥ ४ ॥

**धरूनि अकस्मात नेती । अवघीं कौतुकें पाहती ॥ ५ ॥**
**घरोघरीं फेरे करिती । तैशा होती पुनरावृत्ती ॥ ६ ॥**

याचा अर्थ स्पष्ट आहे:—" माया होळी पेटली असून तिच्या सभोंवार सर्व प्राणी प्रदक्षिणा घालून बोंब ठोकतात. ब्रह्मांडकोटी व अमित-सृष्टि त्या होळीमध्यें जळून भस्म होत आहेत. ' ब्रह्मांडकोटयो नष्टाः सृष्टयो बहुशो गताः. ' बाह्यतः सारा मायेचा बाजार पसरलेला आहे तरी अंतर्गत सूक्ष्म ब्रह्मस्वरूप कोंदाटलें आहे त्याचा तूं नीट विचार कर. माया परती सार व नित्यानित्यविवेक ठेवून ब्रह्म तेवढें खाजें आहे, तें आपल्या हातानें काढून घे. ब्रह्मसुख भोगतांना परमानंद आहे, पण तें प्राप्त करून घेणें फार कठिण आहे. ' हरिभक्ति आहे सुळावरिल पोळी. ' लोखंडाचे चणे खावे लागतात तेव्हां ब्रह्मपदीं नाचण्याचा अधिकार येतो. ब्रह्मतत्व विवेकानेंच आणायला पाहिजे. जो सूक्ष्मदृष्टीनें पाहील त्याच्याच हातांत हें खाजें येणार आहे. कित्येक महंत सह्याद्रीच्या किंवा हिमालयाच्या शिखरावर किंवा गुहेंत बसून एकटेच हें खाजें खातात; कित्येक परोपकारी संत हें खाजें साऱ्यांना वाटतात ! बापा, अजून तरी सावध हो. ' अहन्यहनि भूतानि गच्छन्तीह यमालयं, ' प्रत्यहीं असंख्य जीव यमधानीजवनिकेच्या आंत जातात, हें डोळ्यानें पाहत असून तुझी देहबुद्धि अद्याप कशी सुटत नाहीं ? देह हा ओल्या मातीचा गोळा आहे, याचा भरंवसा काय मानतोस ? कडकडीत वैराग्य धारण कर. हीं पोरें पहा, योनिद्वारानें आह्मांला बुडविलें ह्मणून बोंबलत आहेत. आईबाप, बंधुभगिनी, इष्टमित्र कोणीही या यातनेंतून तुला सोडवीत नाहींत, ' सोडवीना राजा देशीचा चौधरी, ' ह्मणून हीं मुलें डोक्या-वर धूळ उडवून घेत आहेत. मुलें अनेक खेळ खेळत आहेत, पण त्यांत-सुद्धां खोल अर्थ आहे. ' होळीच्या गौऱ्या पांच पांच ' असें ओरडत हीं मुलें घरोघर फेऱ्या करून तुला काय शिकवितात ? देह पंचमहाभूतांचा असल्या-मुळें व तो अखेर होळींतच ( सरणांत ) जाऊन पडणार असल्यामुळें मुलें

पांच गौऱ्या मागतात, व घरोघरच्या फेऱ्या करून देहांतरें सुचवितात; म्हणून समर्थ जीवाला बोध करितात कीं, ' बाबरे ! देहबुद्धि सोडून सावध हो, व होळीमधलें खाजें विवेकानें काढून घे व तें स्वतः खाऊन सकळांतें वांटायचा सदुद्योग करण्यांत आयुष्याचें सार्थक कर. "

समर्थांनीं होळीची उपपत्ति याप्रमाणें लाविली आहे. हीच उपपत्ति खरी आहे अशी आमची समजूत आहे. आमच्या धर्मप्रधान देशांत उत्सव, सण वगैरे प्रसंगसुद्धां धर्मबुद्धि वाढविण्यासाठींच योजलेले आहेत. मानवी आयुष्याची क्षणभंगुरता व नश्वरता लोकांच्या मनांत बिंबवून त्यांना वैराग्य-संपन्न करावे या उदात्त हेतूनें होळीचा सण आमच्या समाजांत रूढ केलेला दिसतो. कित्येक फाजील नाजुक प्रकृतीच्या लोकांना त्यांत इथूनतिथून सारा अश्लीलपणा दिसतो. सुधारकांना होळीच्या दिवसांत हिंदुसमाजाला व हिंदु चालीरीतींना शिव्या देण्यापलीकडे दुसरें कांहीं सुचत नाहीं. समाज आहे तेथें कांहीं दांडगेपणा राहणारच. बारा महिन्यांत सारा समाज सारखा पोक्त, गंभीर, व वेदांती राहूं शकणार नाहीं. प्रत्येक देशांतल्या चालीरीतींत कांहीं विशेष मोकळेपणाचे व उद्धटपणाचे प्रसंग असतातच. आपल्या देहांत सुद्धां सर्वच भाग कांहीं ज्ञानेंद्रियें नाहींत, देहाचे सर्व भाग कांहीं नेत्राइतक्या नाजुक व उदात्त रचनेचे नाहींत. खरे राष्ट्रनायक सर्वबाजूंनीं समाजाचा पोक्त-पणानें विचार करितात. समर्थांनीं होळीची उपपत्ति दिली आहे, तिचा विचार करितांना एक गोष्ट आम्हांला सुचत आहे. अलीकडचे सुधारक समर्थ-एकनाथांसारखे महापुरुष आपणांसारखेच सुधारक होते म्हणून नेहमीं सांगत असतात, पण आमच्या या संतांत व अर्वाचीन सुधारकांत साम्य पाहायला जावें, तों प्रतिपदीं विलक्षण वैषम्य मात्र आढळून येतें ! समर्थांसारखे पुरुष हिंदुसमाजघटना कायम ठेवण्यासाठीं अवतरले होते, सुधारकांचा अवतार हिंदुसमाज विस्कळित करून तो अधोगतीला नेण्यासाठीं आहे ! होळी पेटली आहे, सभोंवार लहानमोठे पुरुष बोंब मारीत धुळवड खेळत आहेत,

हें पाहून समर्थांना वरची उपपत्ति सुचली, व तोच प्रकार पाहून सुधारकांना हिंदुसमाजाला शिव्या देण्याचें अवसान चढतें ! आमच्या समाजांत दोष नाहींत असें कोणाचेंही ह्मणणें नाहीं, पण ते दोष दूर करण्याचा प्रयत्न करीत असतांना समाजाचा उपमर्द करण्यास तयार होणें हें कांहीं शहाणपणाचें लक्षण नाहीं. समाजाला वृद्ध पितरांप्रमाणें पूज्य मानून त्याच्या पायांत कोठें कांटा मोडला असल्यास तो युक्तीनें काढणारा पुरुषच खरा समाजहितैषी समजला पाहिजे. समर्थ खरे समाजसुधारक होते, सध्यांच्या सुधारकांप्रमाणें समाजविध्वंसक नव्हते.

वर्ष १, अंक ४.

---

## ११ श्रीनाथांचें अवतारकृत्य.

( शके १४७०–१५२१ )

१. नाथांना देह ठेऊन परवांचे दिवशीं ३०७ वर्षे झालीं. या अवधींत नाथांच्या यशश्चंद्राचा प्रकाश साऱ्या महाराष्ट्रावर पडला आहे. फाल्गुन वद्य ६ ला 'नाथषष्ठी' ह्मणतात व या दिवशीं गोदातीरीं नाथांच्या पैठणास लाख पन्नास हजार यात्रा सहज जमते. नाथांच्या अंगचे गुण जुन्या नव्या सर्व लोकांना अत्यंत प्रिय झाले आहेत. महाराष्ट्रभर जुने लोक 'भानुदास एकनाथ' या अष्टाक्षरी मंत्राचा जप करीत खांद्यावर पताका व हातीं टाळ घेऊन पंढरीप्रमाणें पैठणचीही यात्रा करितात. न्या० माधवरावजी रानडे यांच्या सारख्या प्रार्थनासमाजिष्ठाला सुद्धां आपण नाथांच्या भागवतधर्माचे अनुयायी आहोंत असें ह्मणवून घेण्यांत धन्यता वाटे व त्यांनीं मुंबईस नाथभागवतावर दहा बारा व्याख्यानांचें एक सत्रही पूर्ण केलें

होतें. नाथांचे गुण असेच अलौकिक होते. खरी भूतदया, निरुपम शांति, अद्‌भुत गुरुभक्ति, निस्सीम भगवत्प्रेम, व संसार ब्रह्मरूप मावून तसें आचरून दाखविण्याची लोकोत्तर शक्ति यामुळें नाथांची योग्यता कांहीं अनुपम आहे. त्यांनीं प्रपंचपरमार्थ एकरूपच आहेत असें आचरून दाखविलें. ' शम, दम, तप ' वगैरे ब्राह्मणाचें जें स्वभावज ब्रह्मकर्म सांगितलें आहे त्याप्रमाणें नाथांनीं वागून दाखविलें, किंबहुना कलियुगांत नाथांसारखें कोणाला वागतांच आलें नाहीं. भवप्रस्तर पोटाशीं दृढ धरून ते संसारांतून तरून गेले व जातां जातां लक्षावधि लेकांना तरून जाण्याचा मार्ग दाखवून गेले.

२. परधर्मीयांचे अंमलाखालीं राहण्याचें भाग पडणें या सारखी दुसरी कोणतीच आपत्ति नाहीं, व ही आपत्ति कालक्रमानुसार प्रत्येक राष्ट्रावर केव्हां-तरी आल्याखेरीज राहत नाहीं. मुसलमानी अंमलानें अशी आपत्ति महाराष्ट्रावर प्रथमच आली. तीनशें वर्षें महाराष्ट्र परराज्याखालीं दडपून गेलें होतें व हें छातीवरचें दडपण लांब झोंकून देण्याची महाराष्ट्राची तयारी होण्याच्या प्रारंभींच नाथांचा अवतार झाला. नाथांच्या पूर्वी व नाथांच्या काळीं महाराष्ट्रावर यवनी अंमलाची पक्की झांपड पडली होती. राष्ट्र जिवंत आहे कां मेलें आहे याचीही कोणास दाद नव्हती. महाराष्ट्रांतील लोक पहिल्यापासून शूर, कंटक व स्वाभिमानी आहेत. सहाव्या शतकांत हुएन् संग हा चिनी प्रवासी हिंदुस्थानांत आला होता, त्यानेंही मराठ्यांच्या मर्दुमकीचें, तेजस्वीपणाचें व स्वाभिमानाचें यथार्थ चित्र आपल्या प्रवासवर्णनांत काढलें आहे. शालिवाहनाच्या वेळेपासून राष्ट्रकूट, चालुक्य, जाधव वगैरे शूर मराठ्यांनीं स्वदेशाचें संरक्षण केलें होतें, पण काळ फिरल्यामुळें यावनी अमलाची काळोखी रात्र सुरू झाली. ती तीनशें वर्षें टिकली, नंतर भाग्योदयाचा काळ आला तेव्हां प्रथम प्रहरांत जे तेजस्वी तारे चमकले त्यांत पहिला व पहिल्या प्रतीचा तारा ' श्रीएकनाथमहाराज ' हेच होत.

३. नाथांचा जन्म पैठणास झाला, व त्यांचें सारें चरित्रही पैठ-

णासच झालें. दौलताबादेस श्रीजनार्दनस्वामी हे किल्लेदार असून यांच्या हाताखालीं पांचसहाशें घोडेस्वारही होते. हे परम ब्रह्मनिष्ठ होते. सरकारी नोकरींत असतांनाही यांची दत्तोपासना कधीं ढळली नाहीं. यांचा दरारा एवढा होता कीं, दौलताबादप्रांतीं यांच्या उपास्यदेवतेसाठीं गुरुवार हा सुट्टीचा दिवस केला होता. यांच्या कृपाप्रसादानें नाथांना श्रीदत्तदर्शन होऊन नाथ ब्रह्मनिष्ठ झाले व जगदुद्धार करण्याचा अधिकार त्यांना प्राप्त झाला. नाथांनीं सद्गुरुसेवा अपूर्व केली. कृतार्थ झाल्यावर यवनसेवेंत न शिरतां नाथ स्वग्रामीं परत आले, व भगवद्भजनांत व परोपकारांत आपल्या आयुष्याचा वेच करिते झाले. त्यांच्या चरित्रांतल्या अद्भुत गोष्टी सर्वांस ठाऊकच आहेत. पंतांनीं 'भूताराधनयज्ञीं समदर्शी एक परम हा रमला' असें ह्मटलें आहे. ब्रह्मनिष्ठाची सर्व लक्षणें नाथांनीं 'लेणीं' ह्मणून आपल्या अंगावर घातलीं होतीं. नाथांचें सर्व कुलच पावन होतें. अनागोंदीच्या राजाच्या अमलांतून श्रीविठ्ठलाची मूर्ति पंढरीस आणून भागवत धर्मीयांस आनंदविणारे भानुदासमहाराज हे नाथांचे पणजे व रसिकांस परमाल्हाद देणारे मुक्तेश्वर हे नाथांचे नातु. नाथ सगुणोपासक दत्तभक्त होते. श्राद्धतिथीच्या दिवशीं गावकरी ब्राह्मणांच्या पितरांस नाथांनीं स्वर्गांतून आणलें, उन्हांत तळमळणाऱ्या गाढवाच्या तोंडांत रामेश्वराहून आणलेल्या कावडींचें पाणी ओतलें, महाराच्या अत्युत्कट भक्तीस्तव त्याच्या घरीं ते जेवले पण त्याचवेळीं गांवकऱ्यास इतरत्र दिसले, वगैरे अनेक रम्य कथा सर्व लोकांच्या ऐकण्यांत आहेतच. नाथांचा गृहस्थाश्रम ह्मणजे विरक्तांचें नंदनवनच होतें. नाथांच्या घरीं अभ्यंतर्पण फार होत असें. नाथांची शांति इतकी अनुपम होती कीं, त्यांना राग आणावा ह्मणून लोकांच्या पांचपांचशें रुपयांच्या पैजा लागायच्या! शांति, क्षमा, दया, तितिक्षा या नाथांच्या वाड्यांत दासीसारख्या राबत असत! प्रपंचपरमार्थ दोन्ही साधावयाची इच्छा करणाऱ्याला नाथांसारखा दुसरा सोज्वळ कित्ता नाहीं. साक्षात् भगवान 'बारा वर्षे बसला एकांच्या गृहान सेवकसा!' तेथें इतरांची कथा काय?

४. नाथांनीं ज्ञानेश्वरीचे पाठ मिळवून त्यांवरून शुद्ध प्रत तयार केली व ज्ञानेश्वरीवर पुराणें सांगितलीं. पुढें एकादशस्कंध टीका ( ओवी वीस हजार ), भावार्थ रामायण ( ओवी चाळीस हजार ), रुक्मिणीस्वयंवर व इतर शेंकडों प्रकरणें व हजारों अभंग केले. त्यांची काव्यसंपत्ति अपार आहे. नाथ व्युत्पन्न पंडित होते, पण परमभागवतही होते. नाथांची ओवी फार सरळ, सुबोध व प्रेमळ आहे. नाथांचें ' भजनीभारुड ' ह्मणजे मराठी भाषेंतली एक चीज आहे. नाथांचें ' रुक्मिणीस्वयंवर ' हें अति सुंदर काव्य आहे. श्रीकृष्णरुक्मिणींच्या विवाहाचें त्यांत गोड व रसाळ वर्णन आहेच, पण कथौघाबरोबर जीवशीवांचेंही त्यांनीं लग्न लाविलें आहे ! दक्षिणोत्तर तटांना स्पर्श करून महानदी जशी फूं करीत जाते, त्याप्रमाणें या दोन्ही बाजू सारख्या संभाळून वरील अनुपम काव्य नाथांनीं रचिलें आहे. असो, या लेखांत साधु ह्मणून, कवि ह्मणून किंवा समाजोद्धारक ह्मणून नाथांची योग्यता केवढी मोठी होती हें सांगायचें नाहीं; तर त्यांच्या चरित्राचा राष्ट्रावर काय परिणाम झाला याचें मुख्यतः दिग्दर्शन करावयाचें आहे.

५. यवनांचें राज्य तीनशें वर्षे दक्षिणेंत होतें. तें तरी नर्मदेपासून कृष्णातीरापर्यंतच होतें. नाथांचा जन्म झाला तेव्हां तुंगभद्रातटाकावरचें विजयानगरचें राज्य कळसास चढलें होतें. नाथ सतरा वर्षांचे झाले तेव्हां तालिकोटच्या लढाईंत तें राज्य बुडालें व सारा दक्षिणप्रांत यवनांच्या तावडींत गेला. याप्रमाणें नर्मदेपासून रामेश्वरापर्यंतचा सारा टापू यवनमय झाला. त्याच सुमारास नाथ जनार्दनस्वामींच्या दर्शनास दौलताबादेस गेले. तेथें दत्तदर्शन होऊन ते धन्य झाले, व गुर्वाज्ञेनें गृहस्थाश्रमाची दीक्षा घेऊन परमार्थग्रंथलेखन व आचरण यांच्या द्वारें महाराष्ट्रसमाजांत धार्मिक व नैतिक तेज उत्पन्न करिते झाले. नाथांनाही एकदां हातीं तरवार घेऊन युद्धकार्यास जाण्याचा प्रसंग आला होता. यवनी अंमलाला सारा हिंदुसमाज त्रासून गेला होता. नाथांनींच भागवतांत ह्मटलें आहे:--

**गाई ब्राह्मणांसी जाण । पीडा करिती दारुण ॥**
**क्षेत्र-वित्त-दाराहरण । स्वार्थे प्राण घेताती ॥**

अध्याय १९.

त्या वेळच्या बहुत ग्रंथकारांच्या ग्रंथांत यवनांच्या जुलमाचा तिरस्कार प्रगट झालेला आहे. पण नाथांनीं तो काळ लक्षांत आणून राष्ट्रोद्धाराची एक अत्यंत खात्रीची बाजू राखिली व तिचा अवलंब करून राष्ट्रोद्धार केला.

६. श्रीगीतेंत पार्थानें चचल व प्रबल मनाचा निग्रह करायचा मार्ग भगवतास पुसला होता व त्यास भगवतांनीं 'अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येणच गृह्यते' असें उत्तर दिलें होतें. प्रबळ शत्रूचा पाडाव दोन मार्गांनीं होत असतो. एक मार्ग वैराग्याचा व दुसरा अभ्यासाचा. वैराग्य व अभ्यास दोनही अत्यवश्य आहेत. दोहोंचा मिळून परिणाम मनोजय करणें हाच होतो. वैराग्य व अभ्यास. अभ्यास व वैराग्य. काय उत्कृष्ट जोडी ही! प्रबळ शत्रुरूप गड सर करण्याच्या या दोन माऱ्याच्या जागा आहेत. हे दोन अश्व लावून निश्चयाच्या रथांत बसणारा वीर कसलाही दुर्जय शत्रु असला तरी त्याला सहज जिंकायला समर्थ होईल. आपला राष्ट्ररूप किल्ला परशत्रूंनीं हस्तगत केला असल्यास तो परत मिळविण्यासही हे दोनच उपाय आहेत. वैराग्य म्हणजे राग नसणें; राग म्हणजे आसक्ति. घर, दार, कुटुंब यावर गरमरून जाण्याचा जीवाचा स्वभावच आहे. काम, क्रोध, लोभ तरी या कुटुंब-प्रपचासाठींच जवळ बाळगावे लागतात. ज्यानें वैराग्य आपला सखा केला, त्याला त्रिभुवनांत दुर्जय असें कांहींच राहिलें नाहीं. परमार्थी मनुष्याला ही वैराग्य पाहिजे व राजकारणी मनुष्यालाही वैराग्य पाहिजे संतांनी वैराग्यबळावरच 'स्वधर्माचें संरक्षण व संगोपन' केलें, व शिवरायाला वैराग्यामुळेंच 'स्वराज्याचें संस्थापन' करितां आलें. 'शिवदिग्विजय' नामक श्रीशिवाजीमहाराजाच्या बखरींत शिवरायाच्या तोंडचें एक वाक्य

दिलें आहे. शिवाजीराजे नेहमीं ह्मणतः—" हिंदुधर्मासाठीं आह्मीं फकिरी घेतली आहे." ह्मणजे हिंदुधर्मरक्षणासाठीं आह्मीं दारापुत्रादिकांचा मोहत्याग केला आहे, किंवा राज्यस्थापनेची आटाट करीत आहोंत. तुकोबाही ह्मणतातः–' धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आह्मांसी. ' हेतु एकच, पण मार्ग दिसायला निराळे. तात्पर्य काय कीं, परमार्थांत अथवा राजकारणांत दोहींकडे घरादारावर, स्त्रीपुत्रादिकावर, किंबहुना स्वदेहावरही ममत्व नसावें. हें ममत्व नसणें ह्मणजेच वैराग्य होय. राष्ट्र पतित असलें ह्मणजे बहुतेक सर्व जीव शेणांतल्या किड्यांसारखें विषयमग्न असतात. सध्यां ज्याप्रमाणें हजारों लोक नाटकें, तमाशा, बुद्धिबळाचे किंवा सोंगट्यांचे किंवा पत्त्यांचे डाव, क्रिकेट व क्लबांतल्या मेजवान्या, सोडावाटर, पाव बिस्किटादिकांचें व इतरही अभक्ष्यांचें भक्षण व मद्यादि अपेयांचें पान यांत केवळ चूर होऊन गेले आहेत, त्याप्रमाणें जेव्हां जेव्हां समाजाची अवनति होते, तेव्हां तेव्हां विषयाच्या घाणींतून समाजाला वर उचलूं पाहणारे लोकनायक समाजाला प्रथम विषयपराङ्मुख करितात, व संसारांतही कसें अलिप्त रहावें हें शिकवितात. वैराग्यानें संसारांत अलिप्त कसें रहावें याबद्दल नाथांचाच एक अभंग आहे.

[ १ ]

**ऐसें असावें संसारीं । जोंवरि प्राचीनाची दोरी ॥ १ ॥**
**पक्षी आंगणासी आले । आपुला चारा चरोनि गेले ॥२॥**
**मुलीं घरचार मांडिला । खेळ मोडोनि टाकिला ॥ ३ ॥**
**वाटसरू वाटा आले । प्रातःकाळीं उठोनि गेले ॥ ४ ॥**
**मार्गीं बहुसाल भेटले । तेथें मन नाहीं गुंतलें ॥ ५ ॥**
**एका विनवी जनार्दना । ऐसें असतां भय कोणा ॥ ६ ॥**

खरोखर या अभंगाप्रमाणें ज्याची वृत्ति बनलेली असते तो धार्मिक किंवा राजकीय बाबतींतही समाजाची उन्नति करण्यास समर्थ होतो. नाथांनीं महाराष्ट्राला हें वैराग्य योग्य प्रसंगीं शिकविलें. बाहेरून वैराग्य पण आंतून पूर्ण भगवत्प्रेम, दिसायला विरागी पण आंतून भगवदनुरागी, असें असायला पाहिजे ! भगवत्प्रेमाचा अखंड झरा हृदयांत वाहत असावा. हरि हा आनंदाचा कंद आहे, हरीच्या प्रेमानें उत्पन्न होणाऱ्या सुखापुढें इतर सुखें बापुडीं होतात, नाथांनीं तिसऱ्या अध्यायांत म्हटलेंच आहे:—

**हरिचरणीं अपरोक्षस्थिति । तेथील क्षणार्धाची जे प्राप्ति ॥**
**त्यापुढें त्रिभुवनविभवसंपत्ती । भक्त मानिती तृणप्राय ! ॥१॥**

हें भगवद्भक्तीचें अपरंपार सुख भोगायची पात्रता येण्यापूर्वी सर्व स्वधर्मकर्मे भावपूर्वक करावयाचा कित्येक वर्षांचा अभ्यास केला पाहिजे. सध्यां आमच्या समाजांत भावाचा मोठा दुष्काळ पडला आहे. जिकडे तिकडे मतस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य यांचे पोवाडे खूप ऐकूं येतात ; पण ' भावा ' चा मात्र अभाव झाला आहे ! नाथ सांगतात:—

**भाव तोचि देव भाव तोचि देव । ये अर्थी संदेह धरूं नका ॥**
**भावें भक्ति फळे भावें देव मिळे । निजभावें सोहळे स्वानंदाचे ॥**
**भावचि कारण भावचि कारण । यापरतें साधन नाहीं नाहीं ॥**
**बहुता सुकृतें नरदेह लाधला । भक्तीवीण गेला अधोगती ॥**
**एका जनार्दनीं भावाच्या आवडी । मनोरथ कोडी पुरती तेणें ॥**

भाव, भक्ति, वैराग्य हे गुण नाथांनीं आपल्या समाजाला स्वतःच्या आचरणानें व वाणीनें शिकविले. या गुणांची किंमत आमच्या सर्व समाजाला यथार्थ कळूं लागेल, तर आमच्या राष्ट्रीय उन्नतीचा पाया आम्हीं दृढ घातला असें होईल. श्रीएकनाथ, तुकाराम वगैरे शेंकडों संतांनीं महाराष्ट्राच्या भूमिकेंत

हे अनुपम गुण पेरून ठेविले होते, ह्मणूनच शिवरायासारखा स्वराज्यसंस्थापक महावीर उत्पन्न होतांच सर्व समाज त्याला साह्य करावयास तयार झाला. सध्यां आमच्या देशांत वरील अमोलिक गुणांच्या अभावीं आमच्या चळवळींना यश येत नाहीं. लौकिक चळवळीही यशस्वी होण्यासारखें भक्तिज्ञानवैराग्याचें दैवी सामर्थ्य ज्यांनीं आह्मांला एका काळीं आणून दिलें त्या श्रीएकनाथविभूतींच्या पायीं आमचे सहस्रशः प्रणाम असोत.

वर्ष १, अंक ६.

---

## १२ पाडव्याची राष्ट्रीय प्रार्थना.

१. श्रीरामकृपेनें आज नूतन वर्षारंभ झाला आहे. लोक देवाला मंगलस्नानें घालीत आहेत, श्रीरामजन्मोत्सवार्प्रीत्यर्थ रामायणाचे सप्ताह जागोजाग बसले आहेत, व लोकांनीं गुढ्या तोरणें उभारून या नूतन संवत्सराचा जयजयकार आरंभिला आहे.

२. गुढ्या उभारण्यालाच 'इंद्रध्वजोत्सव' ह्मणतात. वेळूची किंवा वेणूची जी काठी उभारावयाची तिला इंद्रध्वज ह्मणतात. क्षत्रियांनीं हा उत्सव केला ह्मणजे त्यांना राज्यलाभ होतो, व प्रजाजनांना राष्ट्राची अभिवृद्धि होऊन ऐश्वर्यसुखाची प्राप्ति होते.

३. देश स्वतंत्र असो वा परतंत्र असो, मनुष्य श्रीमंत असो वा दरिद्री असो, हा मंगलोत्सव हिंदुमात्रानें परमोल्हासानें करावा. हा उत्सव झाल्यानंतर नऊ दिवसांनीच श्रीरामरायाचा जन्म होतो. शिवाजी महाराजांच्या जन्मापूर्वींही पारतंत्र्यमग्न महाराष्ट्र हा उत्सव भक्तिप्रेमानें करीत असे. मुक्तेश्वर सांगतातः—

कोई वैभवी यष्टिकाकृत । इंद्रकेतु नाम दृढ ।
यांतेंचि दर्शनें पूजनें वाढ । ऐश्वर्याचा नित्य नवा ॥ १ ॥
हा संवत्सराचे आदि । इंद्रध्वज पुण्यगंधी ।
इंद्रप्रीत्यर्थ पूजितां सिद्धी । राज्यलाभ क्षत्रियां ॥ २ ॥

हा मंगलोत्सव केला म्हणून काय होतें ? मुक्तेश्वर सांगतात:—

हें दुःखदोषातीत भुवन । सदा सकाळीं वर्षे घन ।
फळें धान्यें रत्न सुवर्ण । समान पिके धरित्री ॥ ३ ॥

४. हें नूतन वर्ष हिंदी राष्ट्राला सुखाचें, प्रगतीचें व भरभराटीचें जावो, ऐश्वर्याभिवृद्धिरस्तु, शांतिरस्तु, पुष्टिरस्तु, तुष्टिरतु.

५. भरतभूमींतल्या गंगा, यमुना नर्मदा, कृष्णादि पवित्र नद्या, व आमच्या गोमाता क्षीरजळानें आह्मां सर्व स्वकीयांचें पोषण करोत. आह्मां हिंदी लोकांची गोब्राह्मण, संतमहंत, तीर्थक्षेत्रे याविषयींची श्रद्धाबुद्धि वाढून ईश्वरविषयक प्रेमा सर्व राष्ट्राच्या अंगीं खेळो. नास्तिक असतील ते आस्तिक होवोत, पाखांडी असतील ते भाविक होवोत व सर्व हिंदी राष्ट्राचें ऐहिक व पारलोकिक कल्याण होवो.

६. लालबालपालांसारखे आमचे राष्ट्रनायक, आमचे बालस्वयंसेवक, आणि आमच्या राष्ट्राचा अभ्युदय व मोक्ष चिंतणारे जे जे असतील, त्या त्या सर्वांना दीर्घायुरारोग्ययशःप्राप्ति होवो.

७. आमचे आपसांतले कलह मिटून सर्व हिंदी लोक एकजुटीनें परमेश्वरावर निष्ठा ठेऊन आमच्या भरतभूमीच्या उद्धारार्थ झटोत.

८. हिमालय, सह्याद्रि, विंध्य, गिरनार, इत्यादि पर्वतावर व गंगा, यमुना, नर्मदा, गोदा, कृष्णा, तुंगभद्रा, इत्यादि नद्यांच्या पवित्र तीरावर

तपश्चर्या करणारे भगवद्रूप संत आमच्या राष्ट्रोद्धारार्थ चाललेल्या सर्व योग्य चळवळींना यश देवोत. संत आपल्या आशीःप्रभावानें आम्हांस सनाथ करोत :—

**मागें जाले, आतां असती, होणार जे पुढें काय।**
**त्या भागवतांचे म्यां भावें साष्टांग वंदिले पाय॥ १॥**

९. आमचे शेतकरी लोक सस्यसंपन्न होवोत; आमच्या उद्योगी व्यापारी वर्गाला, प्रामाणिक कारागीरवर्गाला, कामकरी वर्गाला, हरहुन्नर करणाऱ्या कुलाकुशल लोकांना, ललित कलांचा अभ्यास करणाऱ्यांना, हें वर्ष सुखाचें जावो. हिंदुस्थान देशांतलें धान्य व संपत्ति हिंदी लोकांच्या पूर्ण सुखसंतोषास प्रसवो. प्रजेच्या व हिंदी राष्ट्राच्या उन्नत्यर्थ राजे झटोत. सर्वत्र धन-धान्य समृद्धिरस्तु.

१०. आमच्या राष्ट्राची पुण्यसंपत्ति वाढो.

११. कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, वसिष्ठ इत्यादि प्राचीन ऋषि व ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, चैतन्य, कबीर, तुळसीदास इत्यादि अर्वाचीन संत आपल्या कृपाकटाक्षानें आम्हांला पुनीत करोत.

१२. अरुंधती, सावित्री, सीता, अंजनी, अनसूया, अहल्या, कौसल्या, मदालसा, कुंती, देवकी, रुक्मिणी इत्यादि महापतिव्रता आमच्या स्त्रीवर्गा-वर अनुग्रह करोत, व आमचा स्त्रीवर्ग प्रज्ञावंत, मेधावंत, श्रद्धावंत व वीर्य-वंत अशा अपत्यांना प्रसवो.

१३. राणा संग, राणा प्रतापादित्य, महाराज विक्रमादित्य, छत्र-पती शिवाजी, यांचे भरतभूमीवर पुन्हा अवतार होवोत. व देवधर्म गोब्राह्मण यांचे संरक्षण त्यांचे हातून होवो. ब्राह्मणवर्गात मनस्वी, तपस्वी व समर्थांप्रमाणें राष्ट्रोद्धारार्थ आपलें आयुष्य खर्च करणारे राष्ट्रकुटुंबी महा-पुरुष निर्माण होवोत.

१४. कुटिलपणा, स्वार्थसाधुपणा, व हिंसकपणा, हे दिग्‍गजाला जाळोन. प्रकाशाला दबकणाऱ्या सर्व पापांचा क्षय होवो.

१५. हिंदुधर्म, हिंदुशास्त्रें, हिंदुकला, हिंदुविद्या व हिंदुराष्ट्र यांचा जयजयकार असो.

१६. हिंदी राष्ट्राला स्वराज्यसुख लाभून त्याची छाप जगावर बसो व त्याचा जयजयकार होवो.

१७ भरतभूमीचा जयजयकार असो, भरतभूपुत्रांचा जयजयकार असो. भरतभूमीच्या उन्नत्यर्थ झगडणाऱ्या लहान थोर सज्जनांचा जय-जयकार असो.

१८. आमचे देह, आमची बुद्धि, आमचें आयुष्य भरतभूमीच्या उद्धारार्थ सर्व होवो. विश्वचक्रांत विश्राम पावणाऱ्या स्वराष्ट्रचक्रीला आजच्या मंगलदिवशीं आम्ही आपलें तनुमनधन-आम्ही आपले दारा, सुत, गृह, प्राण, अर्पण करितों. राष्ट्राच्या विशाल सागरांत तरंगाप्रमाणें चमकणारें आमचें अस्तित्व आमच्या राष्ट्रकल्याणांतच विरघळून जावो.

१९. भरतखंडांत जे जें उत्तम होतें, आहे, व असणार तें तें अंशांशानें तरी आमच्यांत प्रवेशो.

२०. भगवंता रामा! तुझा हा देश जागा झाला आहे. पापाचा अंधार मावळत आहे, पारतंत्र्याची रजनी संपत आली आहे व अज्ञानाचें तिमिर जात आहे. संत व मुमुक्षु तुझ्या गुणांचें गान करून भरतभू पावन करीत आहेत. भावी ऐश्वर्याचा प्रभात झाला आहे. रामा ! जागा हो, डोळे उघड. तुझें मुखारविंद बाळाला डोळे भरून पाहूं दे. तूं येथें पुन्हा अवतार घे. व **"दुर्जनसंहार सज्जनां आधार । भावि कांसी पार पाववितो"** ही आपली बिरुदावळी खरी करून दाखव.

२१. सर्वत्र आनंदीआनंद असो. सीतारामाचा जयजयकार असो.

१२. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या वाणीनें सर्व हिंदी राष्ट्राच्या तर्फेनें भगवंतापाशीं हें वरदान आम्ही मागतों:—

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ १ ॥
जे खळाची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचे ॥ २ ॥
दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥
वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ४ ॥
चलां कल्पतरूंचे अरव । चेतनां चिंतामणींचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ५ ॥
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांहीं सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ६ ॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुषीं । अखंडीत ॥ ७ ॥

---

# १३ श्रीरामजन्म.

**धरित्रीं विश्व रमलें शमलें सर्व पातक ।**
**श्रीराम मेघ गमला, भक्त ते मोर चातक ॥ १ ॥**

—मोरोपंत.

१. नूतन वर्षारंभाचा पहिला पंधरवडा संपूर्ण भारतीयांना परमोल्हासाचा जात असतो. पाडव्यापासून पूर्णिमेपर्यंत हिंदुसमाजांत सर्वत्र आनंदीआनंद दुमदुमून राहतो. पहिला मंगल दिवस पाडव्याचा, नववा रामजन्माचा व पंधरावा मारुतिजन्माचा. पंधरा दिवस जिकडे तिकडे कीर्तनें, भजनें, पुराणें वगैरेंचे उत्सव चालू असतात. उत्तर हिंदुस्थानांत काशी, मथुरा, प्रयाग, अयोध्या वगैरे शेंकडों ठिकाणीं व वऱ्हाडांत एलिचपूर, उमरावती या दोन ठिकाणीं नऊ दिवस ' रामलीले ' चे खेळ बिलक्षण थाटानें, परम उत्साहानें व एकदिलानें लोकशिक्षणार्थ करून दाखविण्यांत येत असतात. जिकडे तिकडे रामनामाचा जयघोष ऐकूं येतो. व चंद्रोदय काळीं समुद्रास जसें भरतें चढतें, त्याप्रमाणें रामजन्मोत्सवप्रसंगीं हिंदुसमाजाच्या सात्विक मनोवृत्तींचा आविष्कार होतो. दशरथाचें पराक्रम, कौसल्येचें भाग्य, भरतलक्ष्मणांची बन्धुप्रीति, सुग्रीवाचें सख्य, सीतेचा पतिव्रताधर्म, मारुतिरायाची स्वामिनिष्ठा, रामरायाचें लोकाराधनव्रत, अयोध्यावासिजनांची रामभक्ति वगैरे सद्गुणांचे ठसे कांहीं कालपर्यंत तरी सर्व जनांच्या चित्तपटलावर स्पष्ट उमटतात. धन्य तो देश व धन्य तो काळ कीं, जेव्हां रामलक्ष्मणभरतशत्रुघ्नांसारखे सत्पुत्र दशरथाच्या राजवाड्यांत नांदत होते; धन्य ते वानरगण कीं, अखिलभक्तशिरोरत्न मारुतिरायांसारखे एकनिष्ठ पुण्यपुंज वीर ज्यांच्या समुदायांत उत्पन्न झाले होते; परमधन्य ते भारतीय लोक कीं, ज्यांनीं आपल्या डोळ्यांनीं मायामानुषवेषभृक् परमात्म्याला साक्षात् पाहिलें ! व अत्यन्तात्यन्त धन्य तो काल कीं, जेव्हां सच्चिद्घनानें पृथिवीभरवारणार्थ अवतार घेतला !

२. रामरायाचा जन्म एकदांच झाला, तेव्हां दरसाल जन्मोत्सव करण्यांत काय फायदा आहे, असें कांहीं अर्वाचीन पंडित ह्मणतात. त्यांना समर्पक उत्तर भावार्थरामायणादि ग्रंथांत दिलें आहे. जेव्हां जेव्हां रावणापासून प्रजेला ताप होतो, तेव्हां तेव्हां रामरायाचा जन्म होतो. रावण ह्मणजे 'रावयति विद्रावयतीति रावणः.' प्रजाजनांना भिवविणारा तो रावण. मनुष्यदेहांत हा अहंकाररूपी रावण सर्व प्रजांना–करणांना–इंद्रियांना घाबरवून दमवून टाकतो; सत्त्वगुणरूपी देवांना रजोगुणरूपी राक्षसांकरवीं जिंकून 'आढ्योऽभिजनवानस्मि कोन्यो ऽस्ति सदृशो मया' अशा आरोळ्या फोडतो; इंद्रियदेवता भगवत्कार्य करावयास मोकळ्या राहूं नयेत ह्मणून त्यांना विषयकारागृहांत कोंडून टाकतो; त्रिविधतापानें सर्व शरीर भाजून पोळून निघतें; साक्षात् परमात्म्याच्या शक्तीला–बुद्धिरूप सीतादेवीला–रावण मदोन्मत्त होऊन अशोकवनिकेंत कोंडून ठेवतो; याप्रमाणें सर्वत्र प्रळयकाळाचीं चिन्हें दिसूं लागलीं ह्मणजे रामरायाच्या हातून रावणाचा वध होतो. बुद्धिसीतेला अहंकाररावणाच्या हातून परमात्मा सोडवितो व मग दशसहस्र वर्षे–अनंतकाळ–रामराज्याचें सुख प्रजांना भोगायला सांपडतें! ह्मणून जोंपर्यंत अहंकाररावणाच्या कचाट्यांत आपण सांपडलों आहोंत तोंपर्यंत रामजन्मोत्सव करणें ह्मणजे अशा उत्सवप्रसंगाची उत्कंठेनें वाट पाहत राहणें हें प्रत्येकाचें प्रधान कर्तव्य होय. रामजन्म तरी नवमीलाच होतो. समर्थ एका अभंगांत 'नवमी करा, नवमी करा' ह्मणून जीवांना बोध करितात, त्याचा हेतु तरी काय? श्रवण, कीर्तन, विष्णुस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व अखेरची पायरी आत्मनिवेदन या प्रकारची नवविधा भक्ति झाली ह्मणजेच रामरायाचा जन्म होतो! मध्यंतरीं होत नाहीं. आत्मनिवेदनाशिवाय रामजन्म नाहीं, रामजन्माशिवाय रावणवध नाहीं, रावणवधाशिवाय सीताप्राप्ति नाहीं व सीतारामांच्या ऐक्याशिवाय स्वानंदसाम्राज्य नाहीं!

३. अथवा इतक्या खोल पाण्यांत न जातां आपण राष्ट्रीयदृष्टीनेंच 'रामजन्माचा' विचार करूं. अध्यात्म रामायणांतील 'भूमिर्भारेण मग्ना०' या श्लोकाचाच विचार केल्यास रामजन्म केव्हां व कोणासाठीं होतो याचा उलगडा होतो. (१) दशवदनप्रमुख राक्षसांच्या भारानें भूमि वांकून जाते. (२) ती गाईचें रूप धरिते. (३) देव व मुनिजन यांस बरोबर घेऊन ती ब्रह्मदेवाकडे रडत जाते. (४) ब्रह्मदेव व इतर सर्व देव भगवान् विष्णूची स्तुति करितात. व (५) विष्णु रामावतार घेऊन पृथ्वीचें व्यसन हरितात. याचा मुद्यांचा थोडासा विस्तार करूं.

४. यज्ञयागादिकांना विघ्न करणारे, गोब्राह्मणांना पीडा देणारे, दुसऱ्या प्राण्यांना जिवंत खाणारे, ते राक्षस. त्यांचा नायक रावण हाहि दहा तोंडांचा. जगत्पीडा करणाऱ्या राक्षसाला दहाच काय पण सहस्रावधि तोंडें होती! तोंड खाण्याकरितां दिलेलें असतें व राक्षस खादाड असतात. दुसऱ्यांचीं घरेंदारें, दुसऱ्यांचे प्राण, व दुसऱ्यांचे देश अनेक तोंडांनीं खाणारे राक्षस जगाला भयप्रद असतात. त्यांची तृष्णा अनिवार असते. ते कोणाला नको असतात, पण त्यांना सर्व पाहिजे असतात! ते कामगति असल्यामुळें त्यांचा संचार सर्वत्र असतो. त्यांच्या क्षुत्पिपासा इतक्या प्रबळ असतात कीं, रुधिरोदकानेंही त्यांचें शमन होत नाहीं. त्यांचीं अक्राळविक्राळ स्वरूपें पाहून सर्व भितात, पण कधीं काळीं त्यांना इतकीं मोहकस्वरूपें धारण करितां येतात कीं, त्यांच्या नाशार्थ अवतरलेल्या सीतादेवीला सुद्धां सुवर्णमृगाची खरी ओळख पटत नाहीं! म्हणूनच त्यांना मायावी किंवा कपटी म्हणतात. अशा राक्षसांनीं पृथ्वीवर उच्छेद मांडला, दीन दुबळ्या प्रजाजनांना ते छळूं लागले, त्यांच्या हिंसक राहणीमुळें पुण्यकर्में बंद पडलीं म्हणजे पृथ्वी गाईचें रूप धारण करिते, ती गाय होते. गाय दीन, अनाथ आहे, त्याप्रमाणें सर्व लोक त्रस्त व हतदर्प होऊन जातात. सर्व प्रजा गाईसारखी अनाथ व प्रतीकार करण्यास असमर्थ अशी होते. जे

तिच्या दुधावर पुष्ट होतात तेच कसाबांसारखे तिच्या पाठीवर चाबकाचे तडाखे लगावूं लागले म्हणजे ती बिचारी मुलुमुलु खालीं मान घालून रडून सर्व सहन करते, व ती ' दिविजमुनिजनांसह ' परमेश्वराचा धांवा करिते. ती पाषाणांसही पाझर फुटण्यासारखा हंबरडा फोडते. हा करुणरसाचा हंबरडा ऐकून सर्व देव तिचा कड घेतात, व तिच्यावर आशीर्वादांची वृष्टि करितात. अनेक मोठमोठे संत, सिद्ध व मुनि त्या मुक्या प्राण्यांसाठीं करुणाघन देवाला आळवितात. रावणानें पृथ्वीला गांजलें तेव्हां वाल्मीकि, वसिष्ठ, विश्वामित्र, भरद्वाज, अत्रि असलाले ऋषि भरतखंडांत जागोजाग तपश्चर्या करीत बसले होते. गाय झालेल्या पृथ्वीला बोलतां येईना म्हणून तिच्या गाऱ्हाण्याचे सर्व अर्ज त्यांच्या मार्फत भगवंताकडे गेले व नंतर भगवंतानें भूतांचें पालन करण्याकरितां दशरथाचे पोटीं जन्म घेतला. सोळाव्या शतकांत औरंगझेबाचे काळीं यवनाक्रांत होऊन भरतभूमि अशीच गाय झाली होती. म्हणून तिचीं दुःखें भगवंतास निवेदन करण्यासाठीं संतमंडळ अवतरलें होतें. राष्ट्रांत भगवन्निष्ठ पुण्यपुरुष अवश्य असावे लागतात. सामान्य जनांचीं गाऱ्हाणीं सामान्य पुढाऱ्यांमार्फत देवांपुढें जात नाहींत. देवाला ज्यांच्या शब्दांची भीड पडेल असे संतच अशा विपत्काळीं राष्ट्राचे खरे हितकर्ते पुढारी होतात सामान्य पुढाऱ्यांची मात्रा सामान्य राजापुढें फार तर चालेल, पण देवाकडे अर्जी पोंचविणारे प्रजाजनांचे वकील म्हणजे संतच होत.

५. संत श्रुतिसिद्ध निर्मळ पदांनीं व सिद्धभक्तांनीं रचलेल्या स्तोत्रांनीं देवाला आळवितात. भगवंतानें अवतार घेण्यापूर्वी पृथ्वी रावणानें गांजून गाईसारखी दीन झालेली असली पाहिजे, ही गोष्ट जितक्या महत्वाची आहे तितक्याच महत्वाची ही गोष्ट आहे कीं, राष्ट्रांत भगवत्पर पुण्यपुरुष पुष्कळ असले पाहिजेत. राष्ट्र जर सर्वच पाप्यांचें झालें तर भगवंताला अवतार घेण्याचें प्रयोजन वाटणार नाहीं. पापी पुरुष पापफळ भोगतील, त्यांची देवाला करुणा कां यावी ? देवाला अव्यक्तांतून व्यक्त व्हावें लागतें तें तीन

कारणांसाठीं. साधूंच्या परित्राणासाठीं, दुष्टांच्या विनाशासाठीं व धर्मसंस्थापनेसाठीं. युगायुगाचे ठायीं भगवान् अवतार घेत आले आहेत, तसे ते पुढेंही घेतील. मात्र राष्ट्रानें आपली पुण्यसंपत्ति वाढविली पाहिजे. रावणाच्या पापाचा उत्कर्ष व प्रजेच्या पुण्याचा उत्कर्ष जेव्हां होईल तेव्हांच रामाचा जन्म होईल. भगवंताचें सांगणें आहेच कीं:—

**किंतु कालानुरोधेन तत्तत्प्रारब्धसंक्षयात् ।**
**हरिष्ये सर्वभूभारं क्रमेणासुरमंडलम् ॥**

अ. रा. २–३७.

राक्षसांच्या पुण्याईचा पोहरा रिता होईल, व प्रजेच्या पुण्याईचा पोहरा भरेल तेव्हांच परमेश्वराचा अवतार होईल. प्रजाजनांनीं कालाकांक्षी होऊन राहिलें पाहिजे व पुण्यसंपत्ति वाढविण्याचा प्रथम यत्न ज्यानें त्यानें केला पाहिजे. अत्यंत विपन्नावस्थेंतून तरून जायला, किंवा भवरोगांतून सुटायला एकच उपाय आहे.

**संसारामयतप्तानां भेषजं भक्तिरेव ते ॥**

सर्व विश्वाचीं सूत्रें चालविणारा परमात्मा समर्थ आहे. त्यास मनोभावें शरण जावें, आपलीं व आपल्या राष्ट्राचीं सर्व दुःखें खऱ्या भावानें त्याला निवेदन करावीत म्हणजे त्याला करुणा येईल, व त्याला करुणा येईल तरच आमचा निभाव लागेल. त्यानें ज्या ज्या वेळीं अवतार घेतले त्या त्यावेळीं प्रजेला सर्व पुरुषार्थ एकदम साधतां आले आहेत, पंत म्हणतात:—

**राष्ट्रांचि न, राम निववी देउनि धर्मार्थकाममोक्ष, मही- ॥**
**मत अनुसरे प्रजाचें असमसा रामराज तो समही! ॥ १ ॥**

रामराज्य आपणांस मिळावें व रामानें पुन्हा अवतार घेऊन आमचा उद्धार करावा, धर्मार्थकाममोक्ष हे चारही पुरुषार्थ आमच्या हिंदी राष्ट्रालाच

नव्हे, तर संपूर्ण महीला त्यानें सधून यावेत, व परमसमर्थ असून ही प्रजा-नुरंजनाचें व्रत चालवून पृथ्वीवरच वैकुंठ आणावें असें खरोखर वाटत असेल तरी आह्मीं सर्वांनीं कंबर बाधून पुण्यसंचय जबरदस्त नेटानें करावयास लागावें. संतमहंतांनीं आह्मांत अवतार घेऊन आह्मांस पावन करण्याइतकें शुद्ध होण्याच्या प्रयत्नास आह्मीं लागावें. रामचरित्र आह्मीं अखंड गावें, घ्यावें, व रामरूप होऊन रामासारखें वागावें.

**राम गावा राम घ्यावा । राम जीवींचा विसांवा ॥ १ ॥**
**कल्याणाचें जें कल्याण । रघुरायाचें गुणगान ॥ २ ॥**
**मंगळाचें जें मंगळ । राम कौसल्येचा बाळ ॥ ३ ॥**
**राम कैवल्याचा दानी । रामदासा अभिमानी ॥ ४ ॥**

वर्ष १, अंक १२.

---

## १४ पंढरीची यात्रा.

**पंढरीशीं जा रे आल्यांनो संसारा ।**
**दीनाचा सोयरा पांडुरंग ॥ १ ॥**
**वाट पाहे उभा भेटीची आवडी ।**
**कृपाळु तांतडी उतावीळ ॥ २ ॥**
**मागील परिहार, पुढें नोहे शीण, ।**
**जालिया दरुषण एक वेळां ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे नेदी आणिकांचे हातीं ।**
**बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ४ ॥**

१. आजचा दिवस पुण्याच्या लोकांस खरोखरच पुण्याईचा आहे. पुणें हें स्वराज्याच्या आठवणीचें शहर आहेच. पण पुण्याच्या पंचक्रोशींत आळंदी, देहू, चिंचवड, जेजूरी, वगैरे पुण्यक्षेत्रें असल्यामुळें तें स्वधर्माच्याही आठवणीचें शहर आहे. निदान उभ्या वर्षात आज तरी साधुसंतांच्या व भगवद्भक्तांच्या आगमनानें पुण्याला पुण्यक्षेत्राची योग्यता प्राप्त झालेली दिसते. दर ज्येष्ठ वद्य ९ ला दुपारीं हजारों पुणेकर चतुःशृंगीच्या मैदानाकडे आळंदी व देहू येथून येणाऱ्या पालख्यांना सामोरे जात असतात. संध्याकाळीं पुणें शहराला दहा पांच हजार वारकऱ्यांच्या नामघोषानें कांहींशीं पंढरीची शोभा येते. आज सायंकाळीं गांवांतून नित्याप्रमाणें झुंडींच्या झुंडी श्रीज्ञानेश्वर व श्रीतुकाराम यांच्या पादुकांच्या दर्शनार्थ प्रेमभरानें धांवत जातील व जिकडे तिकडे हरिहरनामांचा गजर पुणेकरांना ऐकायचा सुप्रसंग येईल. शहरांतील जाणते-नेणते, सुशिक्षित-अशिक्षित, वृद्ध-तरुण, पुरुष-स्त्रिया, ब्राह्मण-शूद्र, श्रीमत-गरीब सर्वांनीं आपआपले भेदभाव कांहीं काळ तरी विसरून जावे व 'ज्ञानोबा माउलीच्या' व 'तुकोबा माउलीच्या' नामसंकीर्तनांत दंग होऊन स्वधर्मसुखामृताचें एक दिवस तरी लाजलज्जा सोडून आकंठ प्राशन करावें अशी आमची सर्वांस प्रेमाची विनंती आहे.

२. अशी विनंती सुशिक्षितांना करण्याचा प्रसंग दुर्दैवानें येऊन पडला आहे. आमचे शिकले सवरलेले लोक-मग ते सुधारक असोत वा उद्धारक असोत-नेमस्त वा जहाल असोत-धर्माच्या बाबतींत भयंकर रीतीनें उदासीन झालेले दिसत आहेत. नव्या नव्या सभा, नवीं नवीं संमेलनें, नवे नवे मेळे काढण्याच्या कामांत ते मोठे पटाईत झाले आहेत. देशकालवर्तमानानुसार नवे नवे मेळे त्यांनीं काढूं नयेत असें आमचें म्हणणें नाहीं. पण शेंकडों संतांच्या पुण्याईनें चाललेल्या या वारकरी सांप्रदायाच्या राष्ट्रीय धर्ममेळ्यांत त्यांनीं जाऊन मिसळायला कोणती हरकत आहे? गेल्या पांचपन्नास वर्षांत नवीन मंडळींनीं कित्येक प्रकारचे मेळे काढले, पण बहुतेकांचीं बारशीं आणि

बारावी बरोबरच उरकल्यांत आली! कित्येक मेळे दहा वीस वर्षे टिकले पण क्षयरोग्याप्रमाणें लवकरच नष्टप्राय झाले; बाकीचे जीव धरून आहेत, पण जनसमुदायाच्या जिव्हारीं ते जाऊन भिनले नाहींत! पंढरीच्या वारकऱ्यांचा मेळा सातशें वर्षांचा तरी जुना आहे. दोन दोन चार चार लाख लोक बिन-बोभाट आपलें नामघोषाचें काम उरकून जातात. हा वारकरी मेळा ' निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, तुकाराम ' या धर्मचालकांच्या पुण्याईनें जोरांत चालला आहे. ते सारेच देवाचे अवतार; ' धर्म रक्षावया-साठीं आटाटी ' करणारे महात्मे ते! ' ज्ञानोबा माऊली तुकाराम ' याप्रमाणें या लोकनायकांच्या नामाचा जयघोष करूनही जीव कृतार्थ होतात. सुशिक्षितांचे समुदाय ' ग्यानबा तुकारामा ' च्या पालख्यांना सादर प्रेमानें सामोरे जातील काय? संतमेळे, नामघोष, अवतारी पुरुषांच्या पादुका या विषयींचा प्रेमादर जर आमच्या हृदयांत कायम राहिला असेल, तर येथील खाजगी व निमसरकारी शाळा व कॉलेजें यांतील शिक्षक व प्रोफेसर, केसरी, काळ, भाला, ज्ञानप्रकाश वगैरे संस्थांचे राष्ट्रशिक्षणाचीं कामें करणारे मालक व चालक, जुने भट-भिक्षुक व शास्त्रीपंडित, सरदार व राजेरजवाडे, सारे लोक राष्ट्रीय महासत श्री ज्ञानेश्वरमहाराज व तुकाराममहाराज यांच्या स्मारकाप्रीत्यर्थ अशा राष्ट्रीय मेळयांच्या प्रसंगीं जातीनें हजर राहून स्वोद्धारचा खरा मार्ग स्वीकारतील! पुढारी एकीकडे व समुदाय एकीकडे; पुढाऱ्यांच्या वृत्ति दक्षिणेकडे व जनसमुदायांच्या वृत्ति उत्तरेकडे; असा प्रकार चालल्यास मात्र राष्ट्राचें कांहींच कार्य होणार नाही. या वारकरीपंथांत विलक्षण चिकाटी व तेज आहे. साऱ्या दक्षिणेंत याच्यासारखी तेजस्वी, ऐक्यवर्धक, निश्चय व धैर्य शिकविणारी दुसरी संस्था नाहीं. या संस्थेवर कुत्सित व वेडगळ टीका करणारे पुरुष आत्मघातकीपणाचें काम करीत आहेत असें म्हणावें लागतें.

३, असो. आज ज्या पालख्या पुण्यास आल्या आहेत त्यांबद्दल व या पंढरीच्या यात्रेबद्दल आमच्या वाचकांस आम्ही थोडीशी माहिती देण्याचें योजिलें आहे.

४. पंढरीची मुख्य यात्रा आषाढांतल्या शुद्ध एकादशीस भरतें. शुद्ध एकादशी पंढरीची व वद्य एकादशी आळंदीची असें संतांनीं ठरवून ठेविलें आहे. दिंड्यापताका घेऊन वैष्णव ह्मणजे विष्णुभक्त पंढरीस आज निदान ७०० वर्षे तरी जात आहेत. ज्ञानेश्वर महाराजांच्या ह्मणजे शके १२१२ च्या पूर्वीपासून वारकरी सांप्रदाय अस्तित्वांत आहे. ज्ञानोबाराय स्वतः एका अभंगांत ह्मणतातः-

कुंचे पताकांचे भार । आले वैष्णव डिंगर ॥
भेणें पळति यम किंकर । नामें अंबर गर्जतसे ॥ १ ॥
आले हरिदासांचे थाट । कळिकाळा नाहीं वाट ।
विठ्ठलनामें करिती बोभाट । भक्तां वाट सोपडली ॥ २ ॥
टाळ घोळ चिपळ्या नाद । दिंडी पताका मकरंद ।
नाना वागडियांचा छंद । कवच अभेद नामाचा ॥ ३ ॥

नाथ महाराजही सांगतात:—

पंढरीसी जा रे आधीं । कृपानिधी तो पहा ॥ १ ॥
गाताती भाळे भोळे । प्रेमें सांवळे नाचत ॥ २ ॥
कुंचे पताका गरुडटकें । वैष्णव निके मेळ मिळे ॥ ३ ॥
दिंडी कथा जागरण । एका जनार्दनीं ते पावन ॥ ४ ॥

तात्पर्य काय कीं, ही गंगा ज्ञानोबारायांच्याही पूर्वीपासून महाराष्ट्रावर अमृतसिंचन करीत आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यांच्या नंतर तुकोबा आले. या सर्वांनीं नामकथागंगेंत बुडया मारल्या, स्वतः पावन झाले व तिलाही पावन केली. खांद्यावर पताका घेणें, दिंडी (वीणा) हातीं घेऊन नाम गान, एकादशीचा उपवास व रात्रीं जागरण करणें, सर्व वैष्णवांनीं पंढरीला नामघोष करीत पायीं जाणें, हीं वारकऱ्यांचीं सामान्य लक्षणें आहेत. पंढरीची यात्राही प्राचीन, वारकरी सांप्रदायही प्राचीन व संत मेळ्यांची पद्धतही प्राचीन, तथापि पांचशें वर्षेपर्यंत केवळ ' दिंड्यापताका '

घेऊन हरिदासांचे थाट पंढरीला जात असत. पंढरीस पालखी नेण्याचा प्रघात ८० वर्षांपूर्वी हैबतरावांनी प्रथम पाडला. हे सातार्‍याजवळ आरफळ म्हणून एक गांव आहे तेथें रहात होते. हे सुखसंपन्न असून ज्ञानोबांचे मोठे भक्त होते. विरक्त होऊन उत्तर वयांत ते आळंदीस येऊन राहिले. त्यांना ज्ञानोबांचा साक्षात्कार असे. त्यांच्या वेळेपर्यंत ज्ञानोबांच्या पादुका हातीं घेऊन भक्तजन नाचत पंढरीस जात. " हातीं घेऊनी पादुका । उभा वंदीजन तुका ॥" असें तुकोबा स्वतः सांगतात. ज्ञानोबाच्या पादुका पालखींत घालून समारंभानें मिरवत नेण्याच्या प्रघातास हैबतरावबाबांच्या वेळेपासून जोर आला. आळंदीप्रमाणें इतर ठिकाणाहूनही पालख्या जाऊं लागल्या. सध्यां मुख्यत्वें पुढील पालख्या पंढरीस जातात:—

| | | |
|---|---|---|
| १ आळंदीहून | –श्रीज्ञानेश्वरांची | पालखी |
| २ देहूहून | –श्रीतुकोबांची | ,, |
| ३ पैठणाहून | –श्रीएकनाथांची | ,, |
| ४ त्र्यंबकहून | –श्रीनिवृत्तिनाथांची | ,, |
| ५ एदलाबादेहून | –श्रीमुक्ताबाईची | ,, |
| ६ मच्छेंद्रगडाहून | –श्रीमच्छेंद्रनाथांची | ,, |
| ७ सासवडाहून | –श्रीसोपानदेवांची | ,, |
| ८ आरणगांवाहून | –श्रीसांवतामाळ्याची | ,, |

कांहीं पालख्या नवीन सुरू झाल्या आहेत, व कांहीं मागील बुडाल्याही आहेत. तथापि आळंदी, देहू व पैठण येथील पालख्या मुख्य होत. या पालख्या पंधरा वीस दिवस अगोदर आपापल्या गांवाहून निघतात. सगळ्यांत अधिक यात्रा ज्ञानोबारायांच्या पालखीबरोबर असते. या पालख्यांचे मुख्य दिवस ठरले आहेत, मुक्काम ठरले आहेत. दिंड्या व पालख्यांबरोबर हजारों लोक जातात पण त्यांची टापटीप व अंतर्व्यवस्था इतकी उत्कृष्ट असते कीं नवीन राष्ट्रचालकांनाही तशी साधायला आणखी कांहींतरी वर्षे लागतील.

५ आळंदीच्या पालखीचे मुक्काम तेवढे सांगूं. सर्व पालख्यांचे मुक्काम सांगूं लागल्यास फार विस्तार होईल.

आळंदीच्या पालखीचा मार्ग.

१ जेष्ठ वद्य. ८ आळंदीस रस्थान ठेवतात व वा ९ ला निघतात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | जेष्ठ | वद्य | ९।१० | पुणें. |
| ३ | जेष्ठ | वद्य | ११।१२ | सासवड. |
| ४ | जेष्ठ | वद्य | १३ | कापुरवळ. |
| ५ | जेष्ठ | वद्य | १४ | शिरवळ. |
| ६ | जेष्ठ | वद्य | ३० | लोणंद. |
| ७ | आषाढ | शुा | १ | तरटगांव. |
| ८ | आषाढ | शुा | २ | फलटण. |
| ९ | आषाढ | शुा | ३ | बरड. |
| १० | आषाढ | शुा | ४ | नातेपोतें. |
| ११ | आषाढ | शुा | ५।६ | माळशिरस. |
| १२ | आषाढ | शुा | ७ | वेळापूर. |
| १३ | आषाढ | शुा | ८ | शेगांव. |
| १४ | आषाढ | शुा | ९ | वांखरी. |
| १५ | आषाढ | शुा | १० | रात्रीं श्रीपंढरीस |

६. आळंदीप्रमाणें देहूहूनही पालखी जेष्ठ वद्य ८ ला निघते. दोन्ही पालख्या पुण्यास एक होतात, सासवडास एकत्र जातात, व [illegible] मार्ग पुन: निराळे होतात [illegible]. सर्व पालख्या [illegible] मुक्काम [illegible] वारकरी [illegible], नदी [illegible] असते, पण [illegible]

नद्या, ओहोळ व नाले जसजसे मिळत जातात, तसतसें तिचें पात्र विस्तीर्ण होत जातें; त्याप्रमाणें या पालख्यांना वाटेंत शेंकडो दिंडीवाले व यात्रेकरू दर मुक्कामास येऊन मिळतात व त्यांचा समुदाय वाढत जातो, तो पंढरी जवळ आली म्हणजे दीड दोन लाख लोकांचा समुद्रप्राय जमाव एकवट होतो. वाखरी व शेगांव यांच्यामध्यें सर्व पालख्या जमल्या म्हणजे पंढरीहून नामदेव-रायाची पालखी व पंढरीचे लोक त्यांना सामोरे जातात. आषाढ शुद्ध १० स रात्रीं १२ वाजतां हा सारा प्रचंड समुदाय पंढरीस जमा होतो व पांडुरंगाला वेढा देऊन पूर्णिमेच्या काल्यापर्यंत बसतो.

७, वारकऱ्यांचे व दिंडीपताकावाल्यांचे मुक्काम अगदीं ठरून गेले आहेत. अमक्या दिवशीं अमुक वाजतां अमुक ठिकाणीं मुक्काम व्हायचा हें ठरून गेलें आहे. वारकऱ्यांपाशीं घड्याळें नाहींत, पण ते बिनबोभाट ठरीव जागीं ठरीव वेळेला हजर राहतात. प्रत्येक मुक्कामास सभोंवारच्या गांवचे लोक वारकऱ्यांसाठीं भाकऱ्या करून गाड्यांच्या गाड्या घेऊन येतात. कोणीही यात्रेकरू उपाशी राहत नाहीं. आमच्या राष्ट्रांत वारकऱ्याविषयीं एवढी पूज्यबुद्धि व प्रेम आहे कीं, तो घरून पताका घेऊन बाहेर पडला कीं, त्याला पंढरीस नेऊन घालण्याची व परत पोंचविण्याची सर्व जबाबदारी राष्ट्र आपल्या शिरावर घेतें. वाटेंत कोणापाशीं घोडा असला तर त्याच्या दाण्यापाण्याची सोय होते. पालखी एका मुक्कामाहून हालायची असली म्हणजे तीन वेळां शिंग फुंकतात. पहिल्या शिंगाला लोक सावध होऊं लागतात, दुसऱ्या शिंगाला पालखींभोंवती जमतात, व तिसऱ्या शिंगाबरोबर "पुंडलीक वरदे हारिविठ्ठल" एकदम होऊन पालखी चालूं लागते! एका पालखी-बरोबर अनेक दिंड्या असतात. एकंदर दिंड्या शंभरावर असतील. ज्ञानो-बांच्या पालखीबरोबर बारा पंधरा दिंड्या असतात. दिंडी म्हणजे वीणा. वीणाधारी मुख्य बोवा जे असतात त्यांचे शिष्य व अनुयायी त्यांच्या दिंडी-बरोबरच असायचेच, ते आपली दिंडी सोडून भलतीकडे जायचे नाहींत.

ज्ञानोबांच्या पालखीपुढें पहिली दिंडी ह्मणजे पालखीच्या दांडीपुढची दिंडी हैबत-राव बावांची असायची. दुसरी राजूरकरांची; तिसरी शेडग्यांची; याप्रमाणें सर्व दिंड्या आपआपल्या अनुयायांसह क्रमाक्रमानें जातात. दंगेधोपे होत नाहींत. संथपणानें विठ्ठलनामाचा साद घालीत दिंड्या पालखीबरोबर चालत असतात. वारकरी एकमेकांच्या सोयींकडे नेहमीं लक्ष देतात. वर ज्ञानोबांच्या पालखीचे जे मुक्काम दिले आहेत, त्यांत सहावा मुक्काम आजवर अंदुरीचा होता. पण जवळच्या लोणंद स्टेशनावर शहापूरबेळगांवाकडचे वारकरी उतरतात ह्मणून त्यांच्या सोयीसाठीं त्यांनी अंदुरी सोडून दिली व सहावा मुक्काम लोणंदचा केला! प्रत्येक पालखीबरोबर जे हजारपासून दहा हजारांपर्यंत यात्रेकरू असतात त्यांचा मुख्य तो तो संत होय. देहूच्या पालखीबरोबरच्यांना तुकाराममहाराज हेच मुख्य होत. पैठणच्या पालखीवाल्यांना नाथ हेच मुख्य होत. तथापि यांच्यांत विरोध मुळींच नसतो. दीड दोन लाख यात्रा पंढरीस जमली ह्मणजे सर्वजण आपापल्या फडावर जातात. एवढया प्रचंड समुदायांचे अध्यक्ष कायमचेच सर्व संतांनीं एकमतानें एकदांच नेमून टाकले आहेत! निळेबारायांनी सांगितल्याप्रमाणें:—

**हा गे पहा विटे उभा। सखि हा संतांचा गाभा॥ १॥**

**देव सकळांचेही भाव। अध्यक्ष हें याचें नांव॥ २॥**

८. या यात्रेमध्ये 'रंगण' हा एक प्रसंग मोठा पाहण्यासारखा असतो. साऱ्या यात्रेंत रंगणाचे प्रसंग दोन तीन येतात. पण त्यांतही पंढरीजवळ वाखरी आणि शेगांव यांच्या दरम्यान जें रंगण धरितात तितका आल्हादक दुसरा प्रसंग क्वचितच असेल! मध्यभागीं पालखी ठेवून तिच्या सभोंवार झेंडे व पताका रोवतात, पुष्कळ अंतर ठेवून अति विस्तृत व अफाट असें वाटोळें फेर टाळकरी उभे राहतात व नामस्मरणाचा जयघोष चालवितात, तेव्हां भाविकांच्या चित्ताला जो शुद्धप्रेमानंद होतो तो शब्दांनीं

काय वर्णावा ? त्यावेळीं तरी सर्व संसाराची पूर्ण विस्मृति पडते व जीव ' एक अद्वितीय ' अशा सच्चिदानंदस्वरूपाचा अनुभव घेतो. ' टाळ दिंडी घेऊन हातीं । विठ्ठलराज गाऊं गीतीं ॥ ' अशा प्रकारची भावना होऊन जाते. जाणीव, शाहणीव साऱ्या गुंडाळून ठेवून एका भगवत्प्रेमानें बेहोष होऊन वारकरी एकदां आनंदानें नाचूं लागले म्हणजे प्रेक्षक कितीही पाषाणहृदयी असला तरी विरघळून जातो. भक्तिसुखाचा सोहळा पंढरीसारखा कोठेंही ब्रह्मांडांत नाहीं. अमृताला कंटाळून अमर या नामामृतासाठीं नरदेहाची वांछा करितात. नरदेहांत येऊन जीवानें भक्तिप्रेमामृताचें प्राशन केलें नाहीं तर तो देह श्वानसूकराच्या देहाहून श्रेष्ठ आहे असें मानतां यावयाचें नाहीं. कर्मठपणाचा किंवा जाणतेपणाचा अभिमान नाशाला कारण होतो. भक्तिसुखांत देहभान तर काय पण देहभावनाही उरत नाही. ' प्रसंगीं या नाहीं देहाची भावना ' असें तल्लीन होऊन भक्तमंडळ जेव्हां पंढरीच्या वाळवंटांत भक्त्यानंदानें उन्मत्त होत्साते विठ्ठलरूप होऊन प्रेमपडिभरानें नाचूं उडूं लागतें, तेव्हांचा तो आनंद केवळ भाविकजनगम्य आहे. म्हणून तुकाराममहाराजांनीं मथळ्यावर दिलेल्या अभंगांत सांगितलें आहे कीं, " संसाराला–देहादि प्रपंचाला–आलेल्या जीवांनो ! पंढरीला जा. सर्वप्रकारचे ताप नाहींसे करणारा दीनदयाळ पांडुरंग विटेवर उभा आहे. तुमच्या भेटीची त्याला आवडी आहे ! त्याचें दर्शन होतांच मागील पापतापांचा परिहार होतो व पुनः दुःख औषधालाही शिल्लक राहत नाहीं ! श्रीविठ्ठल एकदां कां तुमच्या हृदयमंदिरांत बसला म्हणजे अन्य तापादि शत्रूंच्या हातीं तुम्हांला कधीं देणार नाहीं, हा माझा अनुभव मी तुम्हांला सांगतों आहें. "

वर्ष १, अंक २३.

---

# १५ मराठा.

हिंदुस्थानची भविष्यकालीन स्थिति काय होणार असेल ती होवो, तिचा बिनचूक नकाशा तयार करणें आज कोणालाही शक्य नाहीं; तथापि तिला रंगरूप यायच्या कामांत मराठ्यांनाच पुढाकार घ्यावा लागेल यांत तिळमात्र शंका नाहीं. हिंदुस्थानचें भविष्य पुष्कळ अंशीं मराठ्यांच्या कर्तबगारीवर अवलंबून राहणार आहे. हिंदुस्थानाला पूर्ण स्वातंत्र्य मिळाल्यास कोणत्या प्रकारची राज्यपद्धति येथें सुरू होईल याबद्दलचे विचार मात्र कांहीं लोकांच्या डोक्यांत आजपासूनच घोळूं लागले आहेत ! कोणाच्या मतें अमेरिकेंतील संस्थानाप्रमाणें हिंदुस्थानांतल्या निरनिराळ्या प्रांतांतले निरनिराळ्या जातीचे, धर्मांचे व मतांचे लोक आपापले प्रतिनिधि निवडून देतील व त्यांच्या विचारानें हिंदुस्थानचीं संयुक्त संस्थानें राज्यकारभार चालवितील. कोणी म्हणतात अठराव्या शतकाप्रमाणें मराठ्यांचें एकछत्री साम्राज्य होईल, किंवा रजपूत, शीख, गुरखे, मुसलमान, यांपैकीं एखाद्या जातीच्या वांट्याला तें ऐश्वर्य येईल. अगर बंगाली लोकांप्रमाणें नादान समजल्या गेलेल्या एखाद्या नवीनच जातीचा भाग्योत्कर्ष होईल. कोणाच्या मतें आजपर्यंत जगांत झाली नाहीं अशा प्रकारची एखादी नवीनच राज्यपद्धती अमलांत येईल. ऐन धामधुमीच्या वेळीं शिवाजीमहाराजांसारखा जो पुरुष पुढें सरसावेल त्याच्या दृष्टीस योग्य वाटेल असेंच स्वरूप तो नव्या राज्यपद्धतीला देईल, किंवा सर्व जनांच्या ऐकमत्याप्रमाणें कांहीं तरी अभूतपूर्व अशीच व्यवस्था होईल, त्याबद्दल वाटाघाट करण्याचे हे दिवसच नाहींत असेंही कित्येकांचें मत दिसतें. कसेंही असो. हिंदुस्थानच्या भविष्यकालीन इतिहासांत महाराष्ट्राचें पुढारीपण ढळणार नाहीं असा आम्हांस भरंवसा वाटतो. हिंदुस्थानची एकंदर प्रगति होईलच. पण महाराष्ट्रीयांनीं आपलें विशिष्टपण गमावतां कामा नये असें आमचें सांगणें आहे. मराठी धर्म,

मराठी भाषा, मराठयांचा इतिहास यांना जगाच्या उलथापालथींत महत्त्वाचें स्थान मिळालें आहे व पुढेंही मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. मराठयांचे राष्ट्र कांहीं मेलें नाहीं व मरणार नाहीं. मराठी भाषा ही संतांची वाणी आहे, ती कांहीं केल्या मरणार नाहीं. मराठी वीरांची व मुत्सद्यांची परंपरा विच्छिन्न होणार नाहीं. गेलें शतक मराठयांना नामर्दपणाचें गेलें, पण याही काळांत झांशीची राणी व तात्या टोपी, विष्णुशास्त्री व टिळक, माधवराव रानडे व जिन्सीवाले अशीं मानवरत्नें ज्या महाराष्ट्रांत पैदा झालीं तो महाराष्ट्र कांहीं मेला नाहीं. अक्कलकोटचे स्वामी व नृसिंह सरस्वती असे महात्मे ज्या महाराष्ट्रांत या काळांतही निर्माण झाले तो महाराष्ट्र धर्मदृष्टयाही मेला नाहीं. महाराष्ट्र कधींही मरणार नाहीं अशी सर्व मराठयांनीं खात्री बाळगावी. मराठयाचें विशिष्ट राष्ट्रीयपण आहे व तें जतन झालें पाहिजे. सर्व हिंदुस्थानचें ऐक्य झालें पाहिजे हें खरें आहे, पण मराठ्यांचें मराठेपणही कायम राहिलें पाहिजे. मराठ्यांचा अर्वाचीन इतिहास सहाशें वर्षांचा तरी आहे. या काळांत महाराष्ट्रांतल्या सर्व जातींत व सर्व प्रांतांत कर्ते व श्रेष्ठ पुरुष झाले आहेत व सर्वांचें मिळून महाराष्ट्र झालें आहे. महाराष्ट्र जितकें ब्राह्मणांचें, मराठ्यांचें व शूद्रांचें आहे तितकेंच तें अतिशूद्रांचेंही आहे. मराठी भाषा बोलणारे, मराठी धर्म पाळणारे, मराठी इतिहासाचा अभिमान वाहणारे सर्व मराठे एका बलाढ्य राष्ट्राचे घटकावयव होत. महाराष्ट्राला धर्म, भाषा व राजकारण या तिन्हीं बाजूनें उच्चपदाप्रत नेणारे अनेक धर्मवीर, भाषावीर व युद्धवीर झाले आहेत.

वर्ष १, अंक २१.

# १६ गोदा आणि आड
## उर्फ
## भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग.

**मोर्वेकांठीं होता आड । करूनि कोड कवतुक ॥ १ ॥**
**देखण्यांनीं एक केलें । आइत्या नेले जीवनापें ॥ २ ॥**
**राखोनियां होतों ठाव । अल्पजीव लावूनी ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे फिटे धणी । हे सज्जनीं विश्रांती ॥ ४ ॥**

—श्रीतुकाराम.

१. ह्या तुकाराममहाराजांच्या अभंगाचा अर्थ पुष्कळ वर्षें आह्मांस लागला नव्हता. आह्मी पुष्कळ शास्त्र्यांस, पंडितांस व अर्वाचीन विद्वानांस विचारून पाहिलें, पण व्यर्थ! लटपटाघ्यार्यांतला कांहीं तरी अर्थ ते सांगत. शेवटीं याचा उलगडा एका वारकऱ्यानें सहज करून दिला! त्यानें आह्मांला नाथ-भागवतांतल्या ११ व्या अध्यायांतल्या ' प्रायेण भक्तियोगेन' ह्या ४८ व्या श्लोकावरची नाथांची टीका वाचण्यास सांगितलें. आणि चमत्कार हा कीं, ती टीका वाचतां क्षणींच वरील अभंग मजेनें उलगडला! हें पाहून आह्मांस फार आनंद झाला! व आमच्या विचारांची साखळी तयार होण्यास त्यानें फार मदत केली. ज्ञानेश्वर, एकनाथ आणि तुकाराम यांचा अन्योन्य संबंध किती जिव्हाळ्याचा होता व उतरत्या क्रमानें त्यांचा एकमेकांवर काय परिणाम झाला हें समजल्यानें त्यांचे ग्रंथ लावणें फार सुलभ जातें. '**ज्ञानाचा एका**' ही ह्मण वारकऱ्यांत प्रसिद्ध आहे. एकनाथ ज्ञानेश्वरांचा अवतार होत, असा तिचा अर्थ आहे. ज्ञानेश्वरांच्या मस्तकाला लागलेली मुळी एकनाथांनीं काढली व त्यांच्या पासून ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत

प्रसादार्थ मिळविली ही गोष्ट प्रसिद्ध आहे. खुद्द नाथांच्या एका सांप्रदायिक अभंगांत त्यांनीं आपली गुरुपरंपरा ज्ञानेश्वरांशीं लाविली आहे. नाथांचे गुरु जनार्दन स्वामी होत, यांत तर शंकाच नाहीं. त्यांनीं नाथांस ब्रह्मविद्या शिकविली व ब्रह्मनिष्ठ केलें. नंतर स्वतःच्या वृत्तीच्या दृढतेकरतां त्यांनीं ज्ञानेश्वरीचीं पारायणें केलीं, व ज्ञानेश्वरीवर कित्येक दिवस पुराणें सांगतलीं. ज्ञानेश्वरी ग्रन्थकर्तृत्वाच्या कामांत नाथांस गुरुस्थानीं झाली. ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत हे ग्रंथ बारकाईनें पाहिले ह्मणजे असें वाटतें कीं, नाथ ज्ञानेश्वरांसारखेच परब्रह्मपदाला पोहोंचलेले व स्वानुभवी तर खरेच, पण नाथभागवत ह्मणजे ज्ञानेश्वरीचा विस्तार केलेला सुलभ ग्रंथ होय. नाथभागवत व ज्ञानेश्वरी हे दोन्ही ग्रंथ चांगल्या प्रकारें वाचले पाहिजेत, ह्मणजे ज्ञानेश्वरीच्या योगानें नाथभागवत समजतें व नाथभागवत कळल्यानें ज्ञानेश्वरी समजणें सोपें जातें! ज्ञानेश्वरीचा विस्तार म्हणजे नाथभागवत होय. ही जशी परंपरा बसते, तसाच आणखी एक दुवा तिला जोडला पाहिजे. नाथभागवत ज्याला उत्कृष्ट समजेल त्यालाच तुकोबांचे अभंग उलगडतील! तुकोबाही तीव्रतम वैराग्य व प्रेमलक्षणा भक्तीनें भगवत्स्वरूप झालेले; त्यांनीं पूर्ववयांत दृढाभ्यासासाठीं भंडारा डोंगरावर ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, नामदेवाचे अभंग, कबीरादिकांचे दोहरे वगैरेंचा नित्य व्यासंग ठेवला होता. त्यांनही नाथभागवताचीं तुकोबांनीं एक हजार पारायणें केल्याची प्रसिद्धि आहे; या गोष्टीचेंही प्रत्यंतर तुकोबांचे अभंग नीट पाहिले ह्मणजे कळणार आहे नाथांनीं देह ठेवल्यावर १० च वर्षांनीं तुकोबांचा जन्म झाला आहे. तुकोबांचे अभंग उलगडून घ्यायचे असतील तर नाथभागवत अगोदर समजून घेतलें पाहिजे. ज्ञानेश्वरी, नाथभागवत व तुकोबांचा गाथा–ह्मणजे वारकऱ्यांची तृप्ति झाली! आमच्या पूर्वभाग्यानें आमचा जन्म भरतभूमींत ह्या महाराष्ट्रांत झाला ह्मणून ज्ञानेश्वरापासून मोरोपंतापर्यंत सत्पुरुषांची वाणी अहर्निश आमच्या कानामनांवर सारखी आदळत आहे, व ज्ञानेश्वर, एकनाथ,

तुकाराम, रामदास व मोरोपंत यांच्या स्वानुभावी, प्रासादिक व प्रेममयी सदुक्तींशीं खेळण्याचा बुद्धीला व्यासंग झाला आहे! या व्यासंगापासून जो दिव्य आनंद क्षणक्षणीं अनुभवायला सांपडतो, त्याची तदधिक गोडी आमच्या देशबांधवांनीं घ्यावी असें नेहमी मनाला वाटतें संतवाणी अमृतखाणी, प्राशील तो भाग्यवंत! संतवाणीरूप अमृताच्या नदींत वारंवार बुडया मारल्यानें तनु, मन व कर्म यांचीं पापें सर्व धुवून जातात, 'काय या संतांचे मानूं उपकार। मज निरंतर जागविती' याप्रमाणें कृतज्ञत बुद्धीनें संतांविषयीं अलोट प्रेम उत्पन्न होतें, व शेंकडों वेळां नेत्रांतून प्रेमपुरस्सर खळखळां अश्रुपात होतात!! वाचकहो, ही गोष्ट सांगू नये, पण प्रसंग आल्यानें सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. तुमच्यापाशीं आपलें हृदय मीं कशाला चोरूं? अश्रद्धेचा पापरूप वारा मनाला लागूं न देतां संतांच्या वचनामृताचे घुटके घ्यावचें व्यसन मनाला लावून घ्या, एवढेंच मागणें आहे. आपली जन्मभाषा मराठी होय. हिला ज्ञानेश्वर–नाथ–तुकोबांनीं ब्रह्मविद्येचा परीस बनविलें आहे. ही लोखंडाचें सोनें करिते, पाप्याचा संत बनविते, मुक्याला बोलविते, ज्ञानोबांनी सांगितल्याप्रमाणें ही 'इंद्रियांना चोरून जेवायची' विद्या पढविते. ही काळिकाळांच्या माथां पाय देण्याचें सामर्थ्य अंगीं आणून देते. एका सिद्धानें ह्मटलें आहे:—

> **जैसा सुखासनाचा मार्गु। तैसा महाराष्ट्रप्रसंगु॥**
> **अंगीं बाणे राजयोगु। रोकडाची!॥ १॥**

असो. पहिल्या अभंगावर येऊं या.

२. तुकोबा वरील अभंगांत ह्मणतात:–" गोदावरीच्या कांठीं एक आड होता; पण देखण्यांनीं कवतुक कोड करून मला आइत्या जीवनापें नेलें. त्या ठायीं अल्प जीव लावून ठाव राखोन होतों. त्या ठिकाणींच धणी फिटली. पण हे विश्रांती सज्जनीं मिळते. अन्यत्र नाहीं!" हा वरील

अभंगाचा सरळ अन्वय झाला. याचा अर्थ काय? तो समजून घेण्यासाठीं नाथांकडे गेलें पाहिजे. गोदा कोणती? आड कोणता? जीवन ह्मणजे काय? देखणें कोण? हें सर्व कोडें आतांच उलगडून जाईल.

३. संसार तरून जायला दोन मार्ग आहेत एक ज्ञानमार्ग व एक भक्तिमार्ग. यांपैकीं भक्तिमार्ग हा फार प्रांजळ, निर्विघ्न व नित्यनिर्मळ आहे. मळा शिंपायला दोन मार्ग. मोट व पाट. मोटेचें पाणी तसा ज्ञानमार्ग. सरितेचा पाट तसा भक्तिमार्ग. मोटेच्या पाण्यानें थोडी भुई भिजते आणि श्रम मात्र अपार पडतात. सरितेच्या ओघाचें तसें नाहीं! तेथें जीवनाचे लोट घडघडाट चालतात. मोटेच्या पाण्यासारखें वेदशास्त्रपठण आहे, पण सरितेच्या घडघडाटासारखा भक्तिपंथाचा प्रवाह आहे. पण हें भाग्य मात्र संतापाशींच सांपडतें; अन्यत्र नाहीं. हा नाथांच्या टीकेचा भावार्थ आहे. पण नाथांच्या मुखारुरल्या ओव्याच पुढें देऊं ह्मणजे झालें.

४. नाथ ह्मणतातः—

संसार तरावया लागीं। अनेक साधनें अनेगीं।
बोलिलीं तें जाण वाउगीं। उत्तम प्रयोगीं मद्भक्ति ॥ १॥
उपायांमाजी अति प्रांजळ। निर्विघ्न आणि नित्यनिर्मळ।
माझा भक्तिमार्ग केवळ। ज्ञान तें विकळ मध्यपाती ॥२॥
मळा शिंपावया लागुनी। मोट पाट उपाय दोन्ही।
मोटा काढिजे विहीरवणी। बहुत कष्टोनि अति अल्प ॥३॥
मोट नाडा बैलजोडी। अखंड झोडितां आसुडीं।
येतां जातां बोढाबोढी। भोय भिजे थोडी भाग एक॥४॥

तैसा नव्हे सरितेचा पाट । एक वेळ केल्या वाट ।
अहर्निशीं घडघडाट । चालती लोट जीवनाचे ॥ ५ ॥

मोटेचें पाणी तैसें ज्ञान । करूनि वेदशास्त्रपठण ।
नित्यानित्य विवेकासी जाण । पंडित विचक्षण बैसती ॥६॥

एक कर्माकडे ओढी । एक संन्यासाकडे ओढी ।
एक ह्मणती हे गोष्टी कुडी । देहो वोढावोढी न घालावा॥७

एक ह्मणती तप प्रमाण । एक ह्मणती पुरश्चरण ।
एक ह्मणती वेदाध्ययन । द्यावें दान एक ह्मणती ॥ ८ ॥

ऐसी ज्ञानमार्गाची गती । नानापरींचीं विघ्नें येती ।
विकल्पें नासल्या व्युत्पत्ती । माझी निजप्राप्ती तेथ नाहीं॥९

तैसी नव्हे माझी भक्ती । नाममात्रें मज पावती ।
नामें उद्धरिले नेणों किती । हें त्रिभागवतीं बोलिलें ॥१०॥

जेथें हरिनामाचे पवाडे । तेथें विघ्न कैचें बापुडें ।
विघ्न पळे सद्भक्तापुढें । उघडती कवाडें मोक्षाचीं ॥ ११ ॥

एवं निर्विघ्न मज्जमार्गी सरता । मार्ग नाहीं भक्तीपरता ।
हें सत्य सत्य गा सर्वथा । भक्ति तत्वतां मज पढिये ॥१२।

कोटि जन्मांची पुण्यसंपत्ति । जरी गांठीं असेल आइती ।
तैं जोडे माझ्या संतांची संगती । सत्संगें भक्ति उल्हासे१३

५. या ओव्यांचा अर्थ वाचकांच्या लक्षांत आलाच असेल, गोदा किंवा सरिता ह्मणजे भक्तिमार्ग. आड ह्मणजे ज्ञानमार्ग. देखणे ह्मणजे भक्तिरस जाणणारे संत. जीवनापें नेलें ह्मणजे भक्तिमार्गाला लाविलें. तुकोबांच्या अभंग.चा अर्थ या ओव्यांच्या आधारानें असा लागतो. तुकोबा ह्मणतात:–

" भक्तिमार्गाचा प्रचंड ओघ घडघडाटानें वाहत होता, लक्षावधि प्राणी त्यांत आनंदानें बुड्या मारीत होते, त्याच्याच शेजारीं सांचवणीच्या पाण्यानें तुडुंब भरलेला ज्ञानमार्गाचाही आड होता. पण माझें मोठें भाग्य उदेलें म्हणून साक्षात्कारी जे संत त्यांनीं कवतिककोड करून मज दीन बाळाचे लळे पाळण्यासाठीं मला प्रयास न देतां दयाळूपणानें आइतें जीवनापें नेलें,—भक्तिमार्गास लाविलें. ' मींही ठाव राखून राहिलों, ' म्हणजे श्रद्धाभावानें संतांनीं मला जो मार्ग दाखविला तो मी सोडला नाहीं. ज्या हरिभक्तीच्या मुक्कामावर मला नेलें तेथून मी चळलों नाहीं; इतकेंच काय, पण ' अल्प जीव लावुन ' तेथेंच राहिलों प्रल्हाद-ध्रुवादिकांची भक्ति अपरंपार. त्यांची योग्यता मला कोठून येणार! पण मी आपला गरीब, संतांनीं आपलें म्हटलेलें लेंकरूं, भावार्थानें तेथेंच स्थिरचित्त करून राहिलों. पण आश्चर्य काय सांगूं? तेथेंच संतांनीं कवतुकें लावलेल्या भक्तिमार्गामध्यें गढून रमून राहिलों, यामुळें माझी ' धणी फिटली ' तृप्ति झाली, तृष्णेच्या धांवा खुंटल्या, सकळ इंद्रियें ब्रह्मरूप झालीं, आनंदानें त्रिभुवनें दाटलीं, नारायणानें वसतीस ठाव दिला, व ' आतां निश्चिंतीनें पावलें विसांवा. ' पण हा विसावा कोणामुळें मिळाला हें सांगूं! ' हे सज्जनीं विश्रांती! ' अहो! हा सारा देखण्या दयाळू संतांच्या कृपेचा प्रसाद आहे. संतांच्या दारीं उच्छिष्ट खाऊन हरिपायीं दृढ झालों व तेणेंकरून धन्य कृतार्थ झालों.

वर्ष १, अंक २९.

*     *     *     *     *

" सदर अभंगाचा दुसरा अर्थ आमच्याकडे ' **परशुराम रामदासी** ' यांनीं पाठविला आहे तो आम्ही पुढें देतोंः--

सदरहू अभंग ' संतांविषयीं प्रेम ' या मथळ्याखालीं गाथ्यांत सांपडतो. संतांच्या इतिकर्तव्यतेचा गौरव या अभंगांत केला आहे. अज्ञ जीवांची

आपल्या यथार्थ स्वरूपापासून मायेमुळें जी ताडातोड झालेली आहे ती महावाक्याच्या सदुपदेशानें नाहींशी करून जीवपरमात्म्याचे निरुपाधिक तत्वाशीं ऐक्य करून त्यांना अज्ञानपणांतून मुक्त करणें हें संतांचें इतिकर्तव्य होय. आणि तें या अभंगांत श्रीतुकाराममहाराजांनीं उत्तम तऱ्हेनें प्रतिपादन केलें आहे असें दिसून येतें. अर्थात् या अभंगांत 'तत्वमसि' महावाक्य व त्यापासून झालेला बोध ओतप्रोत भरलेला आहे असें मला वाटतें. तत्पदाचे ठिकाणीं गोदावरीची तुकाराममहाराजांनीं योजना केली आहे आणि त्वंपदाचे ठिकाणीं गोदावरीचे कांठींच असल्यामुळें गोदेच्याच जीवनावर पोसलेला जो आड त्याची योजना केलेली आहे. त्वंपद ऊर्फ आडांतील जीवन व तत्पद ऊर्फ गोदेतील जीवन यांचें जरी ऐक्य होतें तरी आडाला अज्ञानपणामुळें मी जीवन आहें हा बोध नसल्यामुळे तो आडपणाचें ऊर्फ देहबुद्धीचें 'कोडकवतुक' करून होता. परंतु संतांनीं आडाचें आडपण (जीवाची देहबुद्धि) व गोदावरीची नदीपणाची उपाधि (परमात्म्याची ब्रह्माण्डोपाधि) यांचा निरास करून आपल्या ह्मणजे सहज असलेल्या जीवनापें ह्मणजे जीवनपणाशीं (जीवपरमात्म्याचें सहज स्वरूप जें चैतन्य त्याच्याशीं) 'एक केलें' (ऐक्यता केली.) ह्यापूर्वी आड (देहधारी जीव) हा अल्प जीव लावुनी ह्मणजे मी अल्पज्ञ, किंचिज्ञ अशा समजुतीनें ठाव राखून होता, त्याला तुकाराम महाराज ह्मणतात कीं, सज्जनांनीं महावाक्याच्या उपदेशानें 'धणी फिटे' असें केलें ह्मणजे कृतकृत्य केलें आणि विश्रांति दिली. अशा रीतीनें सरळ रीतीनें अर्थ होत आहे असें माझ्या अल्प समजुतीस वाटते."

वर्ष १, अंक ३०.

---

# १७ श्रीकृष्णजन्म.

**सप्रेम गातों गुण माधवाचा। वाचाळ मी भाट रमाधवाचा।**
**वाचा प्रबंध प्रभुवैभवाचा वाचा। हरील ते भ्रम या भवाचा ॥१॥**

—वामनपंडित.

१. उद्यांक श्रीकृष्णजन्मोत्सवाचा प्रसंग साऱ्या भरतखंडभर हिंदुसमाज साजरा करील. कृष्णभक्त वैष्णवांना उद्यांचा दिवस परममंगल व परमानंददायक वाटेल. साधूंच्या परित्राणासाठीं व दुष्टांच्या विनाशासाठीं आजवर भगवंतांनीं अनंत अवतार घेतले व ते पुढेंहि घेतील, पण त्या सर्व अवतारांमध्यें श्रीकृष्णावतारासारखें पूर्णत्व कोठेंहि नाहीं. कृष्णावताराचें कोडें उलगडणें कठीण आहे हें खरें, पण तें उलगडलें म्हणजे धर्मरहस्य हस्तगत झालें असेंच म्हटलें पाहिजे! श्रीकृष्णाचें लावण्य, श्रीकृष्णाची मुरली, गोपिकांचें श्रीकृष्णप्रेम, बाल्यावस्थेंतच केलेल्या पूतनादि दुष्टांचा नाश, श्रीकृष्णाची रास, श्रीकृष्णाचें राधेवरचें व कुब्जेवरचें प्रेम, श्रीकृष्णाचा रुक्मिणीशीं विवाह, श्रीकृष्णाचा गृहस्थाश्रम, श्रीकृष्णकृत कंसशिशुपालादिकांचा वध, श्रीकृष्णाचा अर्जुन व उद्धव यांस उपदेश, श्रीकृष्णाची सुदामप्रीति, श्रीकृष्णाचें भारती युद्धांतलें राजकारण, श्रीकृष्णाचा स्वजनसंहारः—श्रीकृष्णाचीं सर्वच चरित्रें प्रेमरूप आहेत, कृष्णचरित्रासारखा आनंदमय इतिहास कोठेंही नाहीं. कृष्णचरितामृताची गोडी दुसऱ्या कोणत्याही चरित्राला येणार नाहीं. सोळा हजार बायका असून तो पूर्णब्रह्मचारी! सर्वत्र सूत्रधार असून त्याला कसलाही लेप नाहीं! ज्या यादवांना त्यानें स्वतः ब्रह्मांडांत दुर्जय केलें, त्यांना आपल्या डोळ्यांदेखत निर्वीर्य करितांना त्याला दुःख वाटलें नाहीं। द्रौपदीला वस्त्रें पुरविणें, अर्जुनाचे घोडे खाजविणें, धर्माघरीं उष्टीं काढणें, दुर्वासाचा रथ रुक्मिणीसह उन्हांत ओढीत नेणें, दरिद्री ब्राह्मणाला आत्मसम लेखणें, सर्वांना आपलें वे

लावून आपण त्यांत न सांपडणें, कंसादिकांना वधनिमित्तानें सद्गती देणें— अशा श्रीकृष्णलीलांचें कौतुक सर्वांगांचे कान करून ऐकावें. श्रीकृष्ण सर्वत्र सर्वदा होते; पण कोठेंहि नव्हते ! सर्वत्र असून कोठेंहि नाहीं ! असें श्री कृष्णाचें अमृतमय चरित्र जी वाणी गाईल ती पवित्र होईल, जे कर्ण प्राशितील ते धन्य होतील, कृष्णनामाचें जें मन ध्यान करिल तें मनपणाला मुकेल, जो कृष्णचरित्राचें चिंतन नित्य करील तो चैतन्यरूप होईल.

२. श्रीकृष्णचरित्र आजपर्यंत शेंकडों जणांनीं परोपरीनें गायिलें आहे. महाभारत व हरिवंश यांनीं श्रीकृष्णचरित्र प्रथम वर्णिलें. महाभारतांत फक्त श्रीकृष्णाचें राजकारण व्यक्त केलें. पण त्याचें साग्र चरित्र आलें नाहीं, म्हणून श्रीव्यासांनींच भारतानंतर हरिवंश रचिला. त्यानंतर विष्णुपुराण, ब्रह्मपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, भागवतपुराण या चार पुराणांत श्रीकृष्णचरित्र आलें असून या सर्वांत भागवतपुराणानें कृष्णचरित्राची माधुरी अधिक जनांस चाखावयास लाविली. हिंदुस्थानांत प्रत्येक देशी भाषेंत कृष्णलीला आहेतच मराठींत नामदेव, एकनाथ, तुकाराम यांनीं अभंगरूपानें कृष्णाच्या बाललीला वर्णिल्या आहेत. शिवकल्याण, कृष्णदयार्णव, ज्योतिपंत, मोरोपंत, वामन, देवनाथ, वगैरेंनीं मराठींत श्रीकृष्णचरित्रांचें गायन केलेंच आहे. इंग्रजी टीकापद्धती स्वीकारून अर्धश्रद्धेनें व पूर्ण चिकित्सक बुद्धीनें बंकीमचंद्र चानरजी यांनीं बंगालीभाषेंत व ज्ञानेंद्रनाथ मित्र यांनीं इंग्रजी भाषेंत श्रीकृष्णचरित्रें वर्णिलीं आहेत. बंकीमचंद्रानें विष्णुपुराणाला अधिक प्राचीन मानलें आहे, पण त्यानं अर्वाचीनपंडितांच्या मताप्रमाणें रासप्रकरण प्रमाण मानलें नाहीं. ज्ञानेंद्र मित्रानें अधवट श्रद्धेनें हरिवंशाला प्रमाण धरिलें आहे पण त्यानें मनुष्यभावानें कृष्णचरित्र वर्णिलें आहे. अमेरिकेंत श्रीकृष्णाचीं मंदिरें बांधून श्रीकृष्णभक्तीची गोडी तेथल्या लोकांना लावणारे बाबा प्रेमानंदभारती यांनींही पूर्ण श्रद्धेनें इंग्रजींत एक कृष्णचरित्र लिहिलें आहे. तें फार सरस असून इंग्रजींतून श्रीकृष्णचरित्र वाचण्याची गोडी बाळगणारांनीं तें अवश्य वाचावें.

आमच्या मराठी साधुसंतांनीं व कवींनीं भागवतावर पूर्ण श्रद्धा ठेऊन श्रीकृष्ण-चरित्र वाचलें व गायिलें आहे. संतांच्या वचनाची माधुरी फार आहे. पूर्णश्रद्धेनें वाचा, अर्धश्रद्धेनें वाचा, मनुष्यभानानें वाचा, फार काय, पण संशयित वृत्तीनें अगर पाखंडीपणाच्या बुद्धीनें वाचा, पण श्रीकृष्णचरित्र एकवारतरी वाचा, वाचल्याशिवाय राहूं नका! जे जे कृष्णचरित्र वाचायला आले ते ते कृष्णभक्तच होऊन गेले. बंकीमचंद्र चातरजी म्हणतात " जनकादि राजर्षी, नारदादि ब्रह्मर्षी, रामचंद्रादि राजे हे सर्वच श्रेष्ठाचारानें मनुष्यजातीचे हितकर्ते झाले आहेत. बुद्ध व ख्रिस्त हे धर्मोपदेशक झाले खरे, पण त्यांच्याठायीं पूर्ण दया नव्हती; आमच्या विभूति सर्वलक्षण-लक्षित आहेत. पण त्या सर्व विभूतींत एक विभूति अशी होऊन गेली आहे कीं, जिच्यापुढें सर्व विभूति मुलांमारख्याच वाटतांत, आणि ती विभूति म्हणजे अर्जुनाचे गुरु, धर्माचे उपदेष्टे, अतुल प्रतापी व पूर्णावतारी श्रीकृष्णच होत! " रामचंद्रादि सर्वच भगवंताचे अवतार आहेत, पण 'कृष्णस्तु भगवान्स्वयम्' श्रीनाथमहाराज भागवतांत कृष्णस्वरूप वर्णितांना म्हणतातः–

**नवल सौंदर्या बीक उठी। सर्वांगीं गुंतल्या जनदिठी।**
**कृष्णस्वरूपीं पडे मिठी। होत लुलुबुटी डोळियां॥ १॥**
**नयन लांचावले लोभा। दृष्टीसी निघालिया जिभा।**
**या परी श्रीकृष्णशोभा। स्वानंदगाभा साकार॥ २॥**
**कृष्ण अतिसुंदर मनोरम। म्हणाल असेल त्यासिं विषयधर्म।**
**तरी तो अवाप्तसकळकाम। आत्माराम श्रीकृष्ण॥ ३॥**
**चहूं आश्रमां प्रकाशकू। त्रिलोकीं कृष्ण गृहस्थ एकू।**
**ताचि ब्रह्मचारी नैष्ठिकू। अति नेटकू संन्यासी॥ ४॥**
**तेणें अवाप्तसकळकामें। ऐसीं आचरिला अगाधकर्में।**
**मानव तरावया मनोधर्में। कीर्ति मेघश्यामें विस्तारिली॥५॥**

**ऐसा निजकीर्तिउद्गारू । पूर्णब्रह्म सारंगधरू ।**
**लीलाविग्रही सर्वेश्वरू । पूर्णावतारू यदुवंशीं ॥ ६ ॥**

३. श्रीकृष्णाचा अवतार झाला याबद्दल हिंदु मनुष्याला स्वप्नांत सुद्धां शंका येणार नाहीं. तथापि अर्वाचीन शिक्षणानें जे शंकित झाले असतील त्यांना एवढें सांगणें जरूर दिसतें कीं, मॅनियर वुइलियमसारख्या पाश्चात्य पंडितानें सुद्धां स्पष्ट कबूल केलें आहे कीं, " महाभारतासारखे इतिहासग्रंथ ऐतिहासिक सत्याच्या पायावर उभारले नसते तर ते खात्रीनें इतके लोकप्रिय झाले नसते. " कवि वर्णनाच्या भरांत उद्दिष्ट भावनेच्या प्रसारार्थ रूपकादि वर्णनप्रकार भिन्नभिन्न प्रकारानें वर्णितात, पण मूळकथा खऱ्याच असतात. श्रीकृष्णानें बाळपणीं पूतना, अरिष्ट, केशी वगैरे दुष्टांना गति दिली; गाडी उलथून पाडली; कालियाचें मर्दन केलें; गोगोपरक्षणासाठीं गोवर्धन पर्वत करांगुलीवर उचलून धरिला; या कथा हरिवंश, विष्णुपुराण, व भागवत यांमध्ये वर्णिल्या आहेत. त्या निःसशय खऱ्याच आहेत. त्या ऐतिहासिक गोष्टी आहेत. अलौकिकत्वाच्या अभाविक पाखंड्यांना त्या खऱ्या वाटल्या नाहींत म्हणून त्या खोट्या थोड्याच ठरणार! श्रीकृष्णावताराला पांच हजारांवर वर्षें होऊन गेलीं. कृष्ण चरित्रातल्या ज्या कथा व्यासापासून तुकारामापर्यंत साऱ्या आत्मनिष्ठ पुरुषांनीं श्रद्धापूर्वक खऱ्या मानिल्या—नव्हे ज्याच्या चिंतनामुळें त्यांना ब्रह्मनिष्ठता प्राप्त झाली त्यांवर—त्या आप्तवाक्यांवर-ज्यांचा विश्वास बसत नाहीं त्यांना पतित म्हणावें व त्यांची कींव करावी यापेक्षां दुसरें काय! कृष्ण म्हणजे प्रेमाची साक्षात् मूर्ति होय! हें प्रेम म्हणजे सोपाधिक प्रेम नव्हे. निरुपाधिक, शुद्ध, आनंदमय अशा प्रेमाची ती मूर्त होय. वृंदावनवासि अखिल जीवांना कृष्णप्रीति उत्पन्न झाली होती. कृष्णाचे बाळगडी कृष्णावर कसें शुद्ध प्रेम करीत हें गोपगोपाळांच्या व सुदामदेवाच्या मधुर कथांवरून स्पष्ट होतें.

४. श्रीकृष्णचरित्र प्रेममय आहे. रासक्रीडा हा कृष्णचरितांचा शिरो-

भाग आहे. गोपींची कृष्णभक्ति जशी होती तशी भक्ति कोणीही केली नाहीं. भगवद्भक्तांत पहिलें स्थान गोपींनाच दिलें पाहिजे. पंतांनीं ह्मटल्याप्रमाणें, 'सोडुनि, पति, सुत, गुरु, गृह, अशन, वसन, धर्म, नीति, श्री, लज्जा' त्यांनीं अनन्यभावानें खरें आत्मसमर्पण केलें व त्या श्रीकृष्णपरमात्म्याला सर्व भावानें शरण गेल्या. गोपींच्या भाग्याचा हेवा कबीरतुकारामासारख्या भक्तशिरोमणींनीं केला! गोपींनीं अंतर्बाह्यसुखानें श्रीकृष्णाला खेळविलें. तुकोबांनीं ह्मटल्याप्रमाणें:—

दिलें त्यांसीं सुख अंतरीचें देवें।
जिहीं एक्या भावें जाणितला ॥ १ ॥
ज्यांचें कृष्णीं तन मन झालें रत।
गृहपतिसुत विसरल्या ॥ २ ॥

एवढा कृष्णभक्त उद्धव महापंडित, महाज्ञानी, पण गोपींची कृष्णभक्ति पाहून लज्जायमान झाला! पंत वर्णितातः—

सुज्ञशिरोमणि उद्धव बहु त्यांचें प्रेमभाग्य वाखाणी।
त्यांसि ह्मणे 'बाई हो! अमृताची प्रेमभाव ही खाणी ॥ १ ॥
देहीं गेहीं झालें चित्त उदासीन कृष्णगुण गातां।
झाला कृतार्थ जन्मुनि, उरलें कर्तव्य काय हो आतां! ॥ २ ॥

श्रीकृष्णानें गोपींच्या (वृत्तींच्या) अंगावरील (वैषयिक) वस्त्रें हिरावून घेऊन त्यांना नग्न निर्विषय केलें, त्यांच्याशीं रास केला, त्यांचा अहंभाव नाहींसा करून त्यांना अंतर्मुख व आत्मनिष्ठ केलें वगैरे कथाभाग परमरमणीय आहे, पण वर्तमानपत्राचा तो विषय करणें बरें वाटत नाहीं. रासक्रीडेच्या परममंगल कथेकडे परमार्थदृष्टीनें पाहण्यासारखे डोळे ज्यांना प्राप्त झाले असतील त्यांना खरोखर गोपींच्या प्रेमाहून वरचढ प्रेम आढळणार नाहीं. जग-

न्मोहक, मुरलीधर, प्रभुरूपाला पाहून गोपी आपलें सर्वस्व जें पतिरूप धन त्याविषयींही उदास झाल्या, तेव्हांच त्यांना कृष्णप्राप्ति झाली. सर्व प्रेमबंध तोडून टाकावेत, अहंवृत्तीचा पूर्ण लय करावा, सर्वस्वार्पण करावें तेव्हांच प्रभुप्राप्ति होते. जगद्व्यवहार चालायला नीति पाहिजे, पण भगवत्प्राप्ती-हून अधिक श्रेष्ठ असें जगांत कांहीं नाहीं. श्रीशुकाचार्य, एकनाथ, तुकाराम, अशा संतांना रासलीलेचें वर्णन करितांना प्रेमाचें पूर्ण भरतें येत असे, आणि मिशनरी व आमच्यांतली कांहीं फाजील सोवळीं (?) माणसें रास-क्रीडेचें नांव ऐकतांच आपल्याच पापवासनेच्या वासानें बिचकून जातात! अमृताच्या ठिकाणीं एखाद्याला विषाची भ्रांति झाली तर तो दोष सर्वथा त्या भ्रांतिष्टाचाच होय! गोकुळांतला कृष्ण निराळा व गीतोपदेष्टा कृष्ण निराळा असा भेद प्रसिद्ध सुधारणाधिपति कै० माधवरावजी रानडे हे करीत असत! विष्णुपुराण, हरिवंश, महाभारत व भागवत या ग्रंथांत असा भेद कोठेंही केला नाहीं व आमचे धार्मिक पुढारी जे साधुसंत त्यांनाही या भेदाचा संशयही कधीं आला नाहीं! गोकुळांतला कृष्ण, मथु-रेंतला कृष्ण, द्वारकेंतला कृष्ण, भारती युद्धांतला पांडवपक्षपाती कृष्ण, उद्ध-वार्जुनांना धर्मरहस्य प्रकट करणारा कृष्ण आमच्यामतें एकच होय! कृष्णचरित्र असें अगाध व सर्वांगसुंदर आहे कीं, कोणत्याही बाजूनें त्याकडे पाहिलें तरी दिव्यप्रेमानें तें थबथबलेलें आहे. द्वारकेस एक रात्र श्रीकृष्णसंगतींत काढून परत आलेल्या सुदामदेवानें स्वस्त्रीपाशीं उद्गार काढला तो असा:—

**पहा श्रीहरिची स्वदासवशता, ब्रह्मण्यता, मित्रता,**
**भक्तीं वत्सलता, वदान्यवरता, भावज्ञता, आप्तता, ।**
**विभुता, प्रभुता, मनोज्ञगुणता, सार्मकता, सेव्यता,**
**चित्तीं आणुनि मी सुखें प्रियतमे! झालों पथीं चालता॥१॥**

५. श्रीकृष्णाचा जन्म मदोन्मत्त झालेल्या दैत्यांचा संहार करण्या-

करितां झाला. त्याकाळीं भरतखंडांत असुर फार प्रबळ झाले होते. कंस, जरासंध, शिशुपाळ हे व यांच्या आश्रयानें राहणारे मायावी राक्षस परोपरीनें भारती प्रजेला छळीत होतें. पृथ्वीनें गोरूप धारण केलें होतें. आसुरी सत्तानें उन्मत्त झालेले असुर जेव्हां पृथ्वीला गांजतात, तेव्हां प्रजा त्रस्त होऊन जाते, गांजणाऱ्यांच्या नांवानें बोटें मोडिते, शिव्याशापांची लाखोली वाहते, पण सत्तेपुढें शहाणपणा नाहीं या न्यायानें तिला जुलमाचा प्रतीकार करितां येत नाहीं. अशा आपत्तीनें जर्जर झालेली प्रजा देवाची करुणा भाकते देवाला दया येऊन दीनजनपरित्राणार्थ व धर्मसेतुरक्षणार्थ तो अवतार घेतो. मात्र तो एखाद्या गरीब कुळांत खेडवळांच्या संगतीत आपलें बाळपण काढतो व शुद्धमनस्क अशा भाबड्यांचे चित्त आपल्याकडे ओढून घेतो. त्याला शब्दपंडित, साशंक वृत्तीचे, भाटवत् बडबड करणारे, निष्क्रिय व वक्रबुद्धि असे नागरिक आवडत नाहीत. श्रीरामानें वानरांचे साह्य घेतलें, शिवरायाला मावळ्यांचा पाठिंबा होता, श्रीकृष्णानें गवळ्यांच्या चित्तवृत्ति हरण केल्या! या गोष्टींत मोठें रहस्य आहे असें आम्हांस वाटते! खेडवळ लोक शुद्ध मनाचे, मोकळ्या स्वभावाचे, निष्कपटी, सदाचारी, प्रेमळ अंतःकरणाचे असे असतात. तुकोबांनी म्हटलें आहे:—

**हरि गोपाळांसवें सकळा। भेटे गळयां गळा मेळवूनी ॥ १ ॥**
**भाविकें त्यांची आवडी मोठी। सांगे गोठी जीवींचिय॥२॥**
**योगियांच्या ध्याना जो नये। भाकरी त्यांच्या मागोनि खाये३**
**तुका म्हणे असे शहाणिया दुरी।घोबडियां वासा हाका मारी४**

श्रीकृष्णाला प्रेमळ भक्त आवडतात. तो आपल्या जीवींचें गुज पंडितांना सांगत नाहीं, तर प्रेमळांना सांगतो. प्रभूचा अवतार व बाळपण ज्या वृंदावनवासी जनांच्या संगतींत गेलें ते खचितच परम धन्य होत. असो. वसुदेवदेवकी यांचा विवाह झाल्यानंतर देवकीबंधू दुरात्मा कंस हा रथावर

बसला असतो एकदम आकाशवाणीनें म्हणजे दुष्ट कंसाच्या अंतस्थ प्रेरणेनें त्याला सांगितलें कीं, देवकीच्या अष्टम पुत्राच्या हातून तुझा वध होणार आहे ! मनुष्य सुष्ट असो, दुष्ट असो, त्याचा स्वभाव, शील व विचार यांच्या संयोगानें त्याच्या बुद्धीवर जे संस्कार घडतात त्याप्रमाणें त्याच्या हृदया-काशांतून भविष्यकाळीं होणाऱ्या गोष्टींच्या सूचना त्यास होत असतात ! तेव्हां प्रलंब, बक, चाणूर, तृणावर्त, महाशन, मुष्टिक, अरिष्ट, पूतना, केशी, धेनुक, इत्यादि दुर्बुद्धि असुरांच्या साह्यानें यादवांचा व प्रजाजनांचा छळ करणारा जो कंस त्याला देवकीचा यदुकुलोत्पन्न जो वसुदेव त्याच्या शेजारीं बसल्या-वर विजेच्या धक्याप्रमाणें हृदयांतल्या आकाशवाणीनें आगामि संकट सुच-विलें हें साहजिकच झालें ! देवकीचा वध करण्यास तात्काळ तो कंस उद्युक्त झाला. त्याला वसुदेवानें बोध करून निवारिलें, देवकीनेंही कंसाला प्रेमानें विनविलें:—

काय कारण बा ! तूज वध कराया ?
काय केला अन्याय बंधुराया ! ।
बहुत होती मजवरी तुझी माया
कशी निष्ठुरता आज आलि हृदया ? ॥ १ ॥

माय मारी बाळासि जरी हातें
कोण त्यातें मग वांचवूं पहातें ? ॥
कोण त्राता तुजवीण सांग मातें !
बंधुराया ! दे प्राणदान मातें ! ॥ २ ॥

—वैजनाथ.

'जीं मुलें होतील तीं तुझ्या स्वाधीन करीन, पण तूं देवकीला मारूं नकोस.' असें वसुदेवानें सुचविल्यावर कंसानें तिला सोडलें, पण उभयतांना कैदेंत ठेविलें. त्या दुष्ट कंसानें तिची सात मुलें मारलीं.

दुःखानें नित्य गांजलेल्या व निर्वेद उत्पन्न झालेल्या त्या पावन मातापितरांच्या उदरीं श्रावण वद्य ८ रोहिणी नक्षत्रावर श्रीकृष्णजन्म झाला. तेव्हां सर्वत्र शुभलक्षणें झालीं. श्रीकृष्णाचा जन्म खिस्तिशकापूर्वी १६ शतके म्हणजे ३४०० वर्षांपूर्वी झाला, असें पाश्चात्य पंडित व तन्मतानुयायी आमचे पंडित मानतात; पण भारती युद्धास व कृष्णावतारास पांच हजारांवर वर्षें होऊन गेलीं असें लो. टिळकप्रभृति विद्वानांचें मत आहे. श्रीकृष्णलीलारूप भागीरथीनें या भरतखंडाला आज पांच हजार वर्षें पावन केलें आहे,या अमृतमय गंगेंत लक्षावधि जीव आजवर मज्जन करून संसारार्णव तरूण गेले आहेत, कृष्णजन्माची वार्ता दुष्ट कंसास कळली तर तो या बाळास मारील या भीतीनें देवकीनें त्याला तसेंच वसुदेवाजवळ दिले व नंदपत्नी यशोदेजवळ नेऊन देण्यास सांगितले. वसुदेव जाण्यास निघाला तो मातृप्रेमानें विव्हळ होऊन देवकी रडत रडत म्हणालीः—

**पद.**

**'भाग्यहीन मी' देवकि वदली विनवी वसुदेवा ।**
**'निर्दय हृदयीं उचलुनि नेतां कसें देवदेवा'॥ ध्रु० ॥**

**सजल सघन घन गगनीं वळला वर्षत सूकाळीं! ।**
**घोर शार्वरी आज भासते काळासम काळीं ॥**
**सहा मारिलीं बाळें कंसें सातवें गळलें ।**
**आठवा हा तुम्हीं नेतसां, मन कां हो! वळलें ? ॥**
**बावरला जिव निघूं पाहतो, करपद हे गळले, ।**
**जन्मांतरिचें कोण पाप तें नकळे कीं फळलें ? ॥ १ ॥**

**स्नेहभरें मीं कवटाळुनि ह्याला सोडिलें ॥**
**पायावरि घेऊनि कुमरा नाहीं न्हाणियलें ॥**

नाहीं विचली पुटी स्वहस्तें नाहीं पाजियलें ॥
कुळिचें दैवत त्यातें नाहीं सटवीशीं पुजिलें ॥
देवनाथ प्रभुची हे ऐशी अति दुस्तर माया ॥
स्रवति लोचनीं जीवनबिंदु ती खेदकरी माया ॥ २ ॥

६. वऱ्हाडांतील प्रसिद्ध साधु देवनाथ महाराज त्यांचें हें पद आहे. असो. पुढील कथाभाग सर्वांस माहीत आहेच. श्रीकृष्णानें सर्व असुरांचा वध केला. कंसाला मारिलें, व त्या गादीवर उग्रसेनाला बसविलें. कंसाला बहुनेक यादव त्रासून गेले होते, तथापि स्वज्ञातिद्रोह करणारे कांहीं दुष्टही तेव्हां होतेच. भागवतकार ह्मणतातः–

एके तमनुसंधानाः ज्ञातयः पर्युपासते ।

याचा अर्थ असा आहे कीं, कंसाच्या अनुसंधानानें घेऊन ह्मणजे 'मर्जी पाहून वागत होते बल्कि जशी घरची' या उक्तीप्रमाणें कित्येक लाळघोटे यादव कंसाची मनधरणी करण्यांत गुंग झाले होते! कृष्णाचा पराक्रम जसजसा प्रगट होऊं लागला तसतसें त्याचेविषयीं लक्षावधि लोकांना अत्युत्कट प्रेम वाटत गेलें. शेंकडों राक्षसांचा त्याचे हातून वध होतां होतां त्याची सर्वांवर जशी जरब बसली तसा प्रत्यक्ष कंसवधाचा प्रसंग कंसाच्याच दरबारांत प्राप्त झाला तेव्हां कंसाच्या तर्फेनें एकजणही उठला नाहीं! सर्वांचे प्रेमाशीर्वाद कृष्णावरच वर्षले. भागवतकार ह्मणतातः––

जनः प्रजहृषुः सर्वे कर्मणा रामकृष्णयोः ।
ऋते कंसं विप्रमुख्याः साधवः साधु साध्विति ॥

श्रीकृष्णप्रीति सर्वांना विलक्षण उत्पन्न झाली होती. श्रीकृष्णाच्या बाळलीलेच्या पंतांच्या ४ आर्या देऊन हें प्रकरण पुरें करितों:—

**बाळपणीं अदितीला कौसल्येला न जें नृपाळपणीं,।**
**तें सुख गोपीला दे शतदा दिवसांत देव बाळपणीं ॥ १ ॥**
**भरली वरि आबबशिख नंदवधू शुद्धमाणिगणें हेमें ।**
**आंतहि पुंजीभूत ब्रह्मयाच्या दिव्यगुणगणप्रेमें ॥ १ ॥**
**बसवी बळेंचि तीस स्तन्यार्थी देव तो धरूनि रवी ।**
**शिशुपण तिच्या न केवळ उद्धारा आमुच्याहि ते मिरवीं॥**

७. प्रिय वाचकहो! भगवंताचा आठवा अवतार, वसुदेवाचा आठवा पुत्र, श्रावणांतल्या आठल्या तिथीला जन्मलेल्या श्रीकृष्णपरमात्म्याला निरंतर आठवा, एवढीच सप्रेम विनंति आहे. मध्यरात्र झाली तरी मोह-निद्रा तुह्मांला सोडणार नाहीं काय? अहंकंसाने बंदिशाळेत टाकलेले आपण सर्वच जण श्रीकृष्णाला आठवूं. मध्यरात्र झाली असली तरी त्याचा आठव ठेवू, ह्मणजे मोहममतेच्या अर्गळा तोडून तो सन्मुख उभा राहील. त्याच्या आगमनाबरोबर आपल्या नाशार्थ कंसाने ठेवलेले पाहरेकरी आंधळे होतील, श्रीकृष्ण वासनापूतनेचा, अघासुराचा वध करील, अहंकंसाला ठार मारील, प्रकृतिपुरुषरूपी मातापितरांचीं बंधनें तोडून स्वराज्याच्या साम्राज्यपदावर तुह्मांस बसवील व तुह्मींही कृष्णानंदनिमग्न झाल्यावर या अजन्मजन्म्याचा सोहळा कौतुकानें परम प्रेमानें व परमानंदानें गाऊं लागाल!

अंक २१ वर्ष १,

## १८ पंढरीचा महिमा.

वैकुंठाहुनिही विशिष्ट बहुता गोष्टींस हे पंढरी ।
ते योग्यां सुख दे, न तारि इतरां; हे दर्शनें उद्धरी ! ॥
दे जो पंडितपामरां सम गती वाळूनियां भावना ।
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ? ॥ १ ॥
क्षेत्रें दिव्य मनोहरें हरिहरस्थानें बहु आसती ।
देवाच्याच चमत्कृती अतिशयें ज्या त्या स्थळीं वर्तती॥
भक्तांचा महिमा प्रकाशवि, करी विख्यात साधूजनां, ।
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ? ॥ २ ॥
लोकीं आणिक दैवतें बहुविधें इष्टार्थ-संपादकें ।
सायुज्यप्रद एक विठ्ठल पहा तारी जनां कौतुकें ॥
ज्या ठायीं सगळी अहंकृति गळे कैशा खऱ्यां पूजेना ।
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ? ॥ ॥
योगाभ्यास-उपासना-जपतपानुष्ठान-देवार्चनें ।
ब्रह्मज्ञान असाध्य जें मुनिजनां, तें नामसंकीर्तनें, ।
सत्संगें अपरोक्षलाभ सहजीं जोडे, हरे वासना ; ।
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ॥ ४
साजे साम्य सुरम्य पंढरपुरा ते एक वाराणशी ।
श्रीविश्वेश्वर मोक्षदायक वसे जेथें प्रतिक्षेत्रनी॥

देहांतीं सुख तेथ, येथ उपजे तत्काळ सद्भावना ।
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ? ॥५॥
माध्यान्हीं सुर मज्जना प्रतिदिनीं त्या चंद्रभागेप्रती।
येती भीमरथीस तैं जळ चढे हें सर्वही जाणती ॥
राबे भक्तजनालयीं सलगिनें, तोडी त्रिपद्बंधना ।
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ॥ ६ ॥
श्री ज्ञानेश्वर-नामदेवहि, तुका, श्रीएकनाथादि हे ।
आले वंद्य जगत्त्रयीं इतरही ज्याचे कृपानुग्रहें ॥
यत्पादांबुजदर्शनेंच हरती जन्में जरा यातना ।
ऐसे दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ? ॥ ७॥
आषाढीं आणि कार्तिकीं न वदवे यात्रेचिया संभ्रमा ।
येती संतमहंत दूरुनि सदा त्या पुंडलीकाश्रमा ॥
गंधर्वामर-वृंद ऐकुनि निवे रागस्वरागायना ।
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ? ॥ ८ ॥
जैसा पुंडलिकानिमित्त यमुनातीराहुनी पंढरीं ।
आला भक्तजनाचिया गुणगुणा भाळूनियां श्रीहरी ॥
नर्गुदीं प्रगटोनि पावन करी तद्देशवासी जनां ॥
ऐसें दैवत कोण आन जगतीं श्रीपांडुरंगाविना ? ॥ ९ ॥
रुक्मा नामक दीन मी विविधशें भोगूनि तापत्रयें ।
आलों या उपपंढरीस तुझिया पायीं मनोनिश्चयें ॥
सेतुस्नान करूनि हेतु धरिला वाराणसीची मला ।
यात्रा हे घडवी अनुग्रह करीं, तारीं त्वरें विठ्ठला ॥ १० ॥

—रुक्मा.

# १९ भावार्थाचा दुष्काळ.

१. मागील दशकांत रुक्मा नामक श्रीविठ्ठलभक्तानें पांडुरंगमाहिमा वर्णिला आहे तो किती यथार्थ आहे हे या लेखांत दाखवावयाचें आहे. आषाढी एकादशीची महापर्वणी जवळ आली आहे. हजारो वारकरी पंढरीस जाऊन पोहोंचले आहेत, हजारों मार्गस्थ झाले आहेत व दशमीच्या दिवशीं रात्रीं बारा वाजतां श्रीपंढरी यात्रेकऱ्यांनीं नुस्ती फुलून निघेल. महाराष्ट्रांतही गांवोगांव विठ्ठलाच्या नामाचा जयघोष चालेल व ' ग्यानबातुकारामाच्या ' प्रामादिक वचनांच्या निरूपणी व्याख्यानांचा सुकाळ होईल. श्रद्धावंताला हा पर्वकाळ परमानंदाचा वाटतो. पंढरीक्षेत्राचें महात्म्य नामदेव तुकारामादि साधुसंतांनीं वर्णिलें आहे तें सर्वतोपरी खरें आहे; पंढरीच्या राण्यानें लाखों भाविकांच्या चित्तवृत्ति आकर्षूण घेतल्या आहेत. एकादशीस ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, तुकाराम वगैरे धर्मवीर आपापलीं पथकें घेऊन श्रीविठ्ठलराजाच्या कृपाछत्राखालीं एकवटतील, व त्यांच्या आकाशगामी कीर्तिपताका त्यांच्या अनुयायांना प्रोत्साहन देतील आणि ही दोन लाख भाविकांची सेना विठ्ठलनामाचा जयघोष करीत कळिकाळावर निकराचा हल्ला करून त्याला जमिनदोस्त करील! असा आनंदाचा, वीरश्रीचा व दिव्य प्रेमाचा प्रसंग ज्यांना वारंवार पाहण्याची सुसंधि येते, ते खरोखरच मोठे भाग्यवत होत.

२. वरील पांडुरंगमहिम्यांत ' रुक्म ' यानें मुख्यतः पांच गोष्टी सांगितल्या आहेत. ती पंचसूत्री अशी:—

( १ ) पांडुरंग पंडितपामरां समगति देतो.

( २ ) भक्तांचा महिमा वाढवितो.

( ३ ) नामसंकीर्तनावरि योगिदुर्लभ असें ब्रह्मज्ञान देतो.

( ४ ) दर्शनमात्रें सद्भावना उपजवून सत्संगद्वारें अपरोक्षलाभ देतो.

( ५ ) संतमहंतांचे मेळे यात्रासंभ्रमास जमतात व त्यांचें भजनसुख पाहून गंधर्वामरवृंद लाळ घोटतात.

३. या पंचसूत्रांपैकीं प्रत्येक सूत्र सिद्धांतवत् आहे तें लक्षावधि श्रद्धावंतांच्या अनुभवाला आजवर आलें आहे व पुढेही येईल. त्याची सत्यता स्थापित करण्याची वेळही स्वधर्मीयांचें राज्य आम्हांवर असतें तर बहुशा आली नसती. पण गेल्या शंभर वर्षांत इंग्रजी अंमल झाल्यापासून व इंग्रजी विद्येचा फैलाव झाल्यापासून आमच्या लोकांतील भक्तिभावाचें गुळखोबरें झालें आहे व जो उठला तो चार पुस्तकें वाचलीं कीं, धर्मसंबंधीं विषयांत तर्कट लढविण्यांत चूर होऊन गेला आहे. पूर्वपरंपरा मोडत चालल्यामुळें, विश्वास नाहींसा होत चालल्यामुळें, व्यक्तिस्वातंत्र्याचें व मतस्वातंत्र्याचें खूळ माजत चालल्यामुळें, धर्माविषयीं अश्रद्धा व अधर्माविषयीं प्रवृत्ति बोकाळूं लागल्यामुळें कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिला नाहीं. नाना मतांचा गलबला व बाजार भरल्यामुळें शांतपणें मनन करण्याला कोणालाही फुरसत मिळेनाशी झाली आहे. ग्रंथज्ञान उदंड वाढलें आहे, लेखनवक्तृत्वांच्या कलांची वृद्धि झाली आहे, सामान्य लोकांतही पूर्वीपेक्षां अनेक प्रकारच्या कल्पना पसरल्या आहेत, पण भगवंताचें अधिष्ठान सर्व राष्ट्राचें सुटल्यामुळें 'जो जे मतीं सांपडला । तयासि तेचि थोर' होऊन सर्वत्र वर्णांचा, जातींचा, कृतींचा, मतांचा भयंकर संकर माजून राहिला आहे ! संकर हा नाशाप्रत नेणारा आहे. 'संकरो नरकायैव' असें अर्जुनानें सांगितलें आहे. हा वर्णाश्रमांचा व आचारविचारांचा संकर मोडून समाज सुव्यवस्थित करण्यासाठीं श्रीशंकराचार्य, श्रीज्ञानेश्वर, श्रीएकनाथ, श्रीरामदास, यांसारख्या महात्म्यांचे अवतार होत असतात. हे पुरुष समाजाचे खरे आधारस्तंभ होत. रामदासस्वामी व शिवाजीमहाराज यांचे अवतार होण्यापूर्वी यवनी अंमलामुळें आपल्या समाजाची स्थिति सध्यांसारखीच झाली होती.

समर्थ ह्मणतात:—

दुष्काळ पडला भावार्थाचा। विश्वास दृढ कैचा ? ॥
विवेक आणि वैराग्याचा। फड मोडोनि गेला ॥ १ ॥
स्वधर्माचा लोप झाला। अधर्मी जन प्रवर्तला ॥
स्वइच्छा गोंधळ घातला। कळीनें सावकाश ॥ २ ॥
सत्य सांगतां अविश्वास। असत्याचा वाटे विश्वास ॥
जैसे राजहंस सोडोनि वायस। आचारशीळ ह्मणती ! ॥ ३ ॥
भक्ति अवघी बुडाली। आणि अभक्ति ठाकली।
आणि ती येतां निघोनि गेली। नीतिमर्यादा ॥ ४ ॥
हरिदासीं साहित्य वाढविलें। हरिदास्य सांडोनि कळावंत जाले
देव सांडोनि फिरो लागलें। मनुष्यांभोंवतें ! ॥ ५ ॥

——जुना दासबोध, समास ११.

## भावार्थ.

आमच्या सांप्रतच्या स्थितीला यांतील प्रत्येक पद कसें लागू पडतें पहा ! भावार्थाचा दुष्काळ आजही पडला आहे. पंढरीचा वारकऱ्यांचा मेळा पुणें शहरांतून आषाढीच्या यात्रेनिमित्त पंढरीस जाऊं लागला ह्मणजे अशिक्षित समजले गेलेले लोक, स्त्रिया, पुरुष, सोनार, शिंपी व इतर धंदेवाले लोक अद्याप ' हा वैष्णवांचा समाज ' पाहून आनंदित होतात; पण सुशिक्षित लोक, या ' टाळकऱ्यां ' ची कुचाळी करीत, व गर्वावरून मजा पहात किंवा स्वदेशकल्याणासाठीं देशभक्तांनीं काढलेल्या शाळेंत कोमल मनांच्या मुलांवर ' मूर्तिपूजे ' च्या विषयीं तिटकारा उत्पन्न करणारीं कोरडीं व्याख्यानें झोडीत अस-

तात! विवेकवैराग्याची वृद्धि करणारे फड आज कोठें आहेत? सोंगट्याबुदबुळांचे, पत्त्याच्या व गंजिफाच्या डावांचे व याहूनही निरर्थक गोष्टींचे फड मात्र पुष्कळ आहेत! ' माझें मत असें आहे, ' ' असें मला वाटतें, ' ' शंकराचार्यांनीं वेदांत काढून जग बुडविलें, ' ' या टाळकन्यांनीं बुद्धिमांद्य उत्पन्न करून कपाळ उठविलें, ' ' संध्या करण्यांत काय अर्थ आहे?' ' संध्येचा अर्थ कळत नाहीं मग ती करावी कां?' ' एकादशी केल्यानें काय होतें?' ' श्रावणीचा उपयोग काय?' ' गणपति हा देव वेदकालीन होता कां अर्वाचीन आहे ' अशा प्रकारच्या तर्कटी गोष्टी करण्यास मात्र शेंकडों लोक तरबेज झाले आहेत! ' सत्य सांगतां अविश्वास ' झाला आहे. ' तुका म्हणे रामनामीं। कृतकृत्य झालों आम्ही ॥ ' याप्रमाणें तुकारामबोवा स्वानुभवानें नामसंकीर्तनाचें महत्व सांगत आहेत; ' विध्युक्त करितां संध्यास्नान। तेथेंचि आहे ब्रह्मज्ञान ' याप्रमाणें नाथमहाराज स्वतः आचरिलेला धर्ममार्ग सांगत आहेत, पण या अनुभवाच्या ' सत्य गोष्टी ' वर लोकांचा विश्वास कमी होऊन रूटरच्या तारांवर, इंग्रजी मुत्सद्यांच्या वचनांवर व बेझंटबाईच्या बोलण्यावर मात्र तो बळकट बसला आहे! त्याचप्रमाणें लोक राजहंसाला सोडून वायसाला आचारशील म्हणूं लागले आहेत! ब्राह्मणांचा द्वेष माजत चालला असून मद्यमांसाहाऱ्यांच्या शुचिर्भूतपणाचे गोडवे जाणते लोक गात आहेत! मुक्ताबाई, जनाबाई, जिजाबाई, अहल्याबाई, गोपिकाबाई, रमाबाई, लक्ष्मीबाई अशा स्त्रिया उत्पन्न होण्यासारखी धार्मिक व सामाजिक स्थिति ज्या आमच्या हिंदुसमाजाची हजारों वर्षांपासून-गार्गी, अरुंधती व सावित्री यांच्या काळापासून-चालत आली आहे त्यांच्यांतल्या स्त्रिया अशिक्षित, परवश व गुलामगिरींत वाढलेल्या म्हणून त्यांची विटंबना परजन व ' सुशिक्षित ' स्वजन करीत आहेत! आणि त्यांच्या उन्नतीसाठीं ख्रिश्चनांच्या हाताखालीं त्यांना शिक्षण देण्यासाठीं ' बायकांचे समाज ' स्थापन होत आहेत! जग उफराटें चाललें आहे असें एका साधूनें म्हटलें आहे तें किती खरें आहे!

स्त्रीशिक्षण जरूर पाहिजे, पण तें आमच्याच समाजांत गृहकृत्यें, धर्मकृत्यें, व समाजकृत्यें त्यांना उत्तम करतां यावीत एवढ्यापुरतेंच पाहिजे आहे. असो. समर्थांनीं सांगितल्याप्रमाणें भक्ति अवघी बुडाली आहे. भक्तिभाव हा अडाणीपणा व अज्ञान यांचा पर्याय शब्द आहे असें बरेचजण समजत आहेत ! भक्ति गेल्यामुळें अभक्ति आली ( लक्ष्मी गेल्यामुळें अवदशा आली ) व अभक्ति येतांच नीतिमर्यादा बुडाली आहे. समर्थांसारखे विचारी पुरुष किती थोडक्यांत पुष्कळ अर्थ सामावतात ! सामाजिक व राष्ट्रीय नीति धर्माच्या पंखाखालीं वाढल्या जातात. धर्माच्या पोटांत नीति येते. राष्ट्रांत धर्म व नीति सुखानें नांदण्यापूर्वी धर्माची बळकटी पाहिजे. धर्म सुटला कीं नीति जाते. उभयतां राष्ट्र सोडून गेले कीं, राष्ट्राचे हाल होतात. ह्मणून धर्म हा सर्वांचा पाया आहे, त्याचें संरक्षण करा कीं तो तुमचें संरक्षण करीलच करील. ' धर्मो रक्षति रक्षितः ' या सिद्धांताचें रहस्यही हेंच आहे. स्वदेशबांधवांचे संघ पाहिजेत, मंडळ्या, मेळे, समुदाय राष्ट्रकार्यासाठीं अवश्य पाहिजेत. ' उदंड समुदाय करावे परि गुप्तरूपें ' असें समर्थच सांगत आहेत. संघशक्ति पाहिजे, पण त्या संघशक्तीला वज्रलेप करणारी हरिभक्तिशक्ति पाहिजे. ह्मणून समर्थ आश्चर्यानें ह्मणतातः–" देव सांडोनि फिरों लागेल । मनुष्यांभोंवतें ! " आमचे नेमस्त लोक अर्ज करून ' कर्झन–मिंटो–मोर्ले ' प्रभृति मनुष्यांभोंवतें फिरतात व एकदां सुद्धां देवाला स्मरत नाहींत ! तसेंच जहाल लोक शिवाजी-गणपतिउत्सव काढूनही सभासंमीलित श्रोतृवृंदाच्या भोंवतीं फिरतात, पण तेही देवाला सांडून फिरत आहेत ! परजनांभोंवतीं फिरण्यापेक्षां स्वजनांभोंवतीं फिरणें पुष्कळपटीनें बरें. पहिल्यानें केवळ आत्मवंचन होते, दुसऱ्यानें लोकशिक्षणाचें तरी कांहीं कार्य साधतें. पण लोकशिक्षणाचें खरें दृढमुल कार्य व्हावें असें ज्या ज्या मनुष्याला वाटेल, त्यानें मध्यभागीं देवाचें अधिष्ठान स्थापून सर्व स्वजनांना घेऊन त्यांच्या भोंवतें फिरावें. एकटें फिरू नये, स्वजनांना घेऊन फिरावें. पण अगोदर भगवंताचें दृढ अधिष्ठान करून मग फिरावें. फिरावें, फिरलेंच पाहिजे, चळवळी

केल्याच पाहिजेत, पण सर्वांची दृष्टि एका नित्य अंतिमाकडे पाहिजे. म्हणजे मुख्यतः ' धर्मस्थापनेची कीर्ति । सांभाळली पाहिजे ! "

४. असो. तर परधर्मीय लोकांच्या व विद्येच्या संसर्गानें आमच्या समाजाची स्थिति कशी विस्कळित होऊन धर्मग्लानि झाली आहे हें येथवर सांगितलें. आतां रुक्मकृत पांडुरंगमाहात्म्यांतून जी पंचसूत्री आम्हीं काढली तिचा अति संक्षेपानें विचार करूं.

५. पांडुरंग पंडित–पामरांना सारखीच गति देतो ही गोष्ट इतिहासावरूनच सिद्ध होत आहे. महिपतबावांचीं भक्तचरित्रें पाहिलीं म्हणजे असें आढळून येतें कीं, भागवतधर्मीयांत एकनाथासारखे पंडितही आहेत व चोखामेळ्यासारखे पामरही आहेत कुल, जाति वर्ण यांचा भेद मनांत न आणतां सर्व जातींच्या व योग्यतेच्या भाविकांना एकच गति म्हणजे सायुज्यमुक्ति दिली आहे. श्रद्धाभक्तिसमन्वित जीव असला म्हणजे तो पांडुरंगाच्या कृपेला पात्र होतो व भगवद्दयापात्र झालेल्या जीवांची जाति किंवा जातीव कोणी पुसत नाहीं. नद्या, नाले, व ओहोळ हा भेद गंगेला मिळेपर्यंतच असतो. लिंगदेह भग्न होऊन गेला म्हणजे जीवदशा संपते व ती संपली कीं, अखंड एकाकार सच्चिदानंदरूप ओतप्रोत भरलेलेंच आहे. मग संत मुक्तिनोवरीशीं चार दिवस खेळीमेळी करितात. पंढरीच्या भागवतधर्मांत व भक्तिपंथांत विशेष आहे तो हा कीं, ब्राह्मणापासून चांडालापर्यंत सर्व जीवांना–भक्तिपूतजीवांना–सायुज्यमुक्ति मिळते. वर्णाश्रमाशीं हा भक्तिपथ विरुद्ध मात्र नाहीं. जन्मसिद्धजातींत राहून प्रत्येकाला पांडुरंगभक्तीनें सायुज्यता मिळवितां येते.

६. इतर क्षेत्रीं देवाचे चमत्कार चालतात व देवाचाच महिमा फार आहे. पण पंढरपुरीं पांडुरंगानें आपल्या भक्तांचाच महिमा वाढविला आहे. नामदेव, जनाबाई, चोखामेळा वगैरे भक्तांच्या घरचीं कामें देवानें करावयाचीं

त्यांच्या घरीं सेवकासारखें राबायचें. याबद्दल शेंकडों कथा प्रसिद्ध आहेत. पांडुरंग तर सर्वांना दिसत नाहीं. तो भक्तांच्या हृदयीं नित्य स्फुरत असतो. जीवांना भक्त मात्र साकार दिसतात, ह्मणून जीवांच्या उद्धारार्थ तो आपल्या भक्तांचा महिमा जगांत वाढवीत असतो.

७. याप्रमाणेच पुढील तीन सूत्रांचा विचार आहे. नामसंकीर्तनाची महती ज्याला समजून घ्यायची असेल त्यानें पंढरीच्या भजनाचा कडाका पहावा. शेकडो मैलांवरून आलेले संत सारा संसार, सारें देहभान विसरून त्रिविधताप पायांतळीं दडपून नामघोष चालवितात तेव्हां सारे संसारबंध तुटून जातात, अंतरिंद्रियें पावन होतात, तृष्णेच्या धावा खुंटून चित्ताची सहज एकाग्रता होते, व योगयागादिकांनीं जो पांडुरंग दुराराध्य त्याचा भजनपूत हृदयांत आविर्भाव होतो! सर्व संत नामाला अमृताची उपमा देतात ती स्वानुभवावरूनच देतात. अभक्तांना नामामृताची गोडी कळणार नाहीं, इतकेंच काय पण तुकोबा विनोदानें ह्मणतात कीं:--

**नामाचा महिमा तुज न कळे पुरुषोत्तमा ॥**
**तुका ह्मणे आह्मां जन्म गोड यासाठीं ॥ १ ॥**

श्रीपांडुरंगदर्शनाचा व पंढरीचा महिमा असा आहे कीं, कसलाही पुरुष असो, गाभाऱ्यांत गेला कीं, विरघळलाच पाहिजे. मूर्ति साधी आहे, बाह्य दृष्टीला मनोहर नाहीं, पण भाविकांना ' सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ' असेंच वाटतें. विठ्ठलदर्शन होतांक्षणींच सद्भावना उत्पन्न होते. तीर्थक्षेत्रांचा महिमा अद्याप बुडाला नाहीं. पांडुरंगदर्शनानें जीव निरभिमान होतो व चित्त चैतन्यरूप होतें. तुकोबा ह्मणतात:--

**उडाउडी अभिमान । आम्ही ऐसें स्थळ कोण ? ॥ १ ॥**
**तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥ २ ॥**
**तुका ह्मणे काला । कांहीं अभेद देखिला ॥ ३ ॥**

पंढरीस जाणारे सर्वच लोक सद्भावानें जातात. एवढ्या मेळ्यामध्यें कांहीं थोडे संतमहंतही आढळून येतात. क्षेत्रांचें महिमान चालतें संतांमुळें; संतांच्या सतस्वरूपाचें यथार्थ दर्शन होण्यास मात्र दृष्टि सद्भावानें चोखाळली पाहिजे बोला:--

पुंडली.कवरदे हरिविठ्ठल.

वर्ष १, अंक ३१.

---

# २० वेदांताचे सिद्धांत.

भूतलांवर आजपर्यंत सहस्रावधि पंथ आणि लक्षावधि मतें निर्माण झालीं, व काळाच्या अनंत पोटांत गडप होऊन गेलीं. प्रत्येक पंथ आणि प्रत्येक मत आपल्या काळांत कांहीं विशिष्ट कार्य करून लय पावतें एवढें मात्र खरें. प्रत्येक चळवळ, प्रत्येक पंथ, प्रत्येक धामधूम, विश्वाच्या चालत्या गाड्याला थोडीबहुत मदत करायलाच उत्पन्न झालेली असते. तिच्यांत जितकें सत्व अधिक, जितका खरेपणा अधिक, जितकें 'उगमा' कडे लक्ष अधिक, तितक्याप्रमाणें तिची व्याप्ति आणि उपयुक्तता ही अधिक असते. आपल्या या भरतखंडात आजपर्यंत अनेक शास्त्रे निर्माण झालीं, पण वेदांतशास्त्राइतकें तेज, जिवटपणा, व श्रेष्ठत्व, इतर कोणत्याही शास्त्रांत आढळून आले नाहीं. त्यामुळें वेदांताची छाप हिंदुस्थानांत लक्षावधि जीवांवर हजारों वर्षेपर्यंत बसली आहे, इतकेंच नव्हे तर परदेशांतले जे जे पंडित या शास्त्राकडे निराभिमानतया पाहू लागले, ते ते तेथेंच चिकटून बसले! उपनिषद्ग्रंथांचें बरवर अध्ययन करणारा शोपेनहॉवर हा 'उपनिषद्ग्रंथांमुळें माझ्या जीवितास परमसमाधान प्राप्त झालें आहे व याच

ग्रंथांत चित्त रमल्यामुळें माझें मरणही शांतपणें होईल' असें म्हणाला होता. आपण वेदधर्मी आहोंत. वेदांचा अंत वेदांतालाच सांपडला. वेदांत शास्त्राची योग्यता दुसऱ्या कोणत्याही शास्त्राला केव्हांही प्राप्त होणें शक्य नाहीं. वेदांतशास्त्रामुळें 'कोहं कथमिदं जातं कर्ता कोवास्य विद्यते' या प्रश्नांचा उलगडा उत्तम प्रकारें झाला आहे, किंबहुना वेदांतशास्त्र अवतीर्ण होण्यापूर्वी या प्रश्नांचा उलगडा मनुष्यसमाजाला झाला नव्हता असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. साधुसंतांचा भक्तिपंथही वेदांताच्या प्रवाहाबरोबरच जाणारा आहे. वेदांत आणि भक्तिपंथ यांच्यांत बिलकूल तफावत नाहीं. साधुसंतांनींही वेदांतांतलें तत्त्वज्ञान कायम ठेवून निर्गु-णाला सगुणाची जोड दिली आहे व हें तत्वज्ञान प्रेमरसानें अमृताधिक मधुर करून टाकिलें आहे. वेदांत परमार्थ रहस्य शिकवितो व प्रपंचाचें खरें स्वरूप व्यक्त करून इहपरगति देतो. वेदांताचें मर्म न कळतां क्षुद्रस्वार्था-साठीं त्याचा दुरुपयोग करणारे दांभिक व लबाड लोक जगांत फार झाले आहेत. यामुळे या शास्त्रावर भडिमार करणारेही पुष्कळ अविचारी लोक आढळून येतात. पण 'जरि उकिरड्यांत पडला, मळला न हिरा तथापि सामान्य' या न्यायानें लबाड आणि मूर्ख लोकांच्या थुंकण्यानें वेदांताची स्वयंसिद्ध योग्यता कांहीं कमी होत नाहीं. कोळशाच्या खाणींत पोटासाठीं काम करणाऱ्या मजुरांच्या हातांत कोहिनूर हिरा सांपडला, तरी त्या हिऱ्याचें स्वत:सिद्ध तेज कांहीं कमी होत नाहीं. वेदांतशास्त्र हा अद्वितीय हिरा आहे व भरतखंडांतील पुण्यपुंज्य संतमहंतांच्या बुद्धिरूप दिव्य खाणींत मनुष्यसमा-जाला तो सांपडला आहे. 'हिरा ठेविता ऐरणीं । वाचे मारितां जो घणीं ॥' या न्यायानें प्रतिपक्षाचे अनेक आघात सोसून त्याचें उत्तमत्व सिद्ध होऊं लागलें आहे. असो. वेदांताचे सिद्धांत काय आहेत हें वेदधर्मीयांना थोड-क्यांत समजावें व वेदांतशास्त्राची श्रेष्ठता त्यांच्या मनांत ठसावी म्हणून आम्ही प्रस्तुत लेख लिहिणार आहोंत. हा लेख आमच्या वाचकांनीं मननपूर्वक

वाचावा अशी आमची त्यांस विनंति आहे. वेदांतशास्त्राचे विशिष्ट गुण येणें-करून स्पष्टतर होतील असा आह्मांस भरंवसा वाटतो.

१. जीव किंवा आत्मा हा मन आणि बुद्धि यांच्या पलीकडचा आहे. –यो बुद्धेः परतस्तु सः–यांच्याहून श्रेष्ठ आहे, ही गोष्ट वेदांतामुळेंच सिद्ध झाली आहे. पाश्चात्य तत्त्ववेत्ते मन आणि बुद्धि यांच्या पलीकडे गेलेले नाहींत, यामुळें ' अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन् ' हें आत्म्याचें शुद्धबुद्ध स्वरूप त्यांना कळलेंच नाहीं ! आत्मा स्वतंत्र आहे, आत्मा अमर आहे व आत्मा कर्तुमकर्तुं समर्थ आहे, हा सिद्धांत साऱ्या जगांत दुसऱ्या कोणालाही कळला नाहीं. स्वतंत्रतेचें हें शुद्ध निर्विकार स्वरूप हें आमचें ऐश्वर्य आहे. आत्मा सद्रूप आहे, चिद्रूप आहे व आनंदरूप आहे. हा आत्म-स्वरूपाचा अनूत्तम ठेवा आमच्या ऋषींनीं आमच्या हवालीं केला आहे. याला आह्मी ओळखूं तर धार्मिक व राजकीय पारतंत्र्य आमच्या वाऱ्यालाही उभें राहणार नाहीं. सर्व जातींचे व मनुष्यांचे हक्क सारखे आहेत ही गोष्ट अधिक उत्तम प्रकारें आत्मा स्वतंत्र व विकारातीत आहे या सिद्धांताच्या द्वारें आमच्या धर्मानें आह्मांला शिकविली आहे. आत्मा अमर आहे हें ज्याला कळलें तो संग्रामाला तोंड देणार नाहीं काय ? आत्मा सत्तारूप आहे हें ज्याला समजलें तो मायेच्या किंवा परकयांच्या सत्तेखालीं सर्वकाळ राह-णार नाहीं ! आत्मा ज्ञानस्वरूप आहे हें ज्याला समजलें तो मायेच्या मोहा-वरणांत गुरफटून जाणार नाहीं. आत्मा आनंदरूप आहे हें ज्याला कळलें तो सुखदुःखाच्या हेलकाव्यांबरोबर चंचल होणार नाहीं. आत्मज्ञानावांचून सर्व कर्मे निरर्थक आहेत असें भगवंतांनींच गीतेंत सांगितलें आहे. आत्मा सच्चिदानंदरूप आहे व तो तूं आहेस हें ओळख असें वेदांत आपणांस शिक-वितो. आपण जन्मनाशादिवर्जित आहोंत हें आपणांस कळलें ह्मणजे आपलें सामर्थ्य अपरंपार वाढेल व आपण अणुपासून ब्रह्मांडापर्यंत व्यापून राहूं !

२. मोक्षाचें उत्तम स्वरूप वेदांत आह्मांला दाखवितो. इतर धर्म

भविष्यकाळच्या सुखाची आशांला लालूच मात्र दाखवितात, पण ' याचि जन्मीं येणेंचि काळें। संसारीं होइजे निराळे ' हें अनुभवाचें प्रत्यक्ष सुख वेदांतामुळें आम्हांस मिळतें. ' मरणाही आधीं राहिलों मरोनी ' हें श्रीतुकोबांचे उद्गार परधर्मीयांना कळणेंही दुरापास्त आहे.

३. ' जगन्मिथ्या ' हा वेदांताचा सिद्धांत पुष्कळ विद्वानांना आकळण्याजोगा नाही. हें सर्व विश्व नश्वर आहे, क्षणभंगुर आहे, जें जें दृष्टीस पडतें तें ते सर्व नाशवंत आहे, आकारलेलें सर्व खोटें आहे, हा सिद्धांत मद्यमांसादि तामस आहारांत वाढलेल्या व प्रपंचसुखार्थ धडपडणाऱ्या लोकांना पटणें कठिण आहे. पण त्यांना तो पटत नाही म्हणून त्याच्या खरेपणाला बाध येत नाहीं. तत्वज्ञानानें शोधून काढलेल्या सिद्धांतांत ' माया मृगजळा ' च्या सिद्धांताइतका निर्लेप मलासिद्धांत दुसरा कोणताही नाहीं. मायाच मुळी खोटी, मग तिच्या आधीन असण्याची गोष्ट कशाला बोलायला पाहिजे ? आत्मा स्वतंत्र आहे आणि तो पराधीन नाही ही गोष्ट ज्याला पटेल तो ब्रह्मदेवापर्यंत सर्व सत्ताधाऱ्यांच्या नाकांत वेसण अडकवायला भिणार नाहीं ! क्यांट आणि शोपेनहार या दोनच पाश्चात्य तत्वज्ञांना ' जगन्मिथ्या ' या सिद्धांतांचें कांहींसें स्वरूप कळलें ! Time, Space and Causality हे मनुष्याच्या कल्पनेंत मात्र आहेत, वस्तुतः नाहीत हे क्यांटनें उत्तम प्रकारें पाश्चात्यांना सिद्ध करून दाखविलें आहे.

४. जीव व शिव किंवा जीवात्मा आणि परमात्मा यांचा अत्यंत निकट संबंध म्हणजे एकात्मता वेदांतशास्त्रानें दाखविली आहे जीव व ब्रह्म यांचें ऐक्य वेदांतामुळेंच सिद्ध झालें आहे. तुकारामादि सर्व संत परमेश्वराशीं लडिवाळपणा करितात, त्याचें कारण हेंच कीं ' जीव परमात्मा दोन्ही। बैसले एकासनीं। जयाचिया हृदयभुवनीं। विराजती ' ह्याची त्यांना प्रचीती असते. हें जीवशीवांचें ऐक्य परधर्मीयांच्या कल्पनेच्या पार पलीकडचें आहे. इतकेंच काय पण परक्यांचे ग्रंथ वाचणाऱ्या माधवराव रानड्या-

सारख्या कुशाग्रबुद्धीच्या पुरुषालासुद्धां बुद्धीनें देखील आकळतां आलें नाहीं! पंतांच्या केकावलीवर टीका करितांना 'आमचे साधुसंत देवापाशीं फाजील सलगी करितात' याचें त्यांना फार आश्चर्य वाटलें! अनंताला तुकोबासारख्यांनीं कसें कोंडलें, व 'अणुरेणुया थोकडा। तुका आकाशा-एवढा' कसा झाला व

गोडीपणें जैसा गूळ। तैसा देव झाला सकळ॥ १॥
आतां भजों कवणेपरी। देव सबाह्य अंतरीं॥ २॥
उदका वेगळा। नव्हे तरंग निराळा॥ ३॥
हेमअळंकारा नामीं। तुका ह्मणे तैसें आह्मीं॥ ४॥

असें सायुज्यमोक्षाचें परमसौख्य तें कसें अनुभवितें झाले, हें त्यांच्या बुद्धीला गम्य होईना, ह्मणून प्रार्थनासमाज स्थापन करून द्वैताचा कीस काढीत ते जन्मभर बसले! जीवात्मा आणि परमात्मा यांच्या एकात्मतेच्या पोटीं जगांत केव्हांही न सांपडणारें सामाजिक नीतिशास्त्र इतक्या अत्युच्च दर्जाचें निघालें कीं, यामुळेंच धर्मकल्पनांत नीतिकल्पनांचा पूर्ण अंतर्भाव होतो हें रहस्य आमच्या तरी प्रथम लक्षांत आलें:—

यस्तु सर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्यति॥
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते॥ १॥
यस्मिन्सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद्विजानतः॥
तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यति॥ २॥

सर्वांशीं समतेनें कां वागावयाचें याचें कारण पाश्चात्यांना सांगतां येणें दुर्घट आहे. आपणच सर्व देहांत भरून राहिलों आहोंत, सर्व देह आपलेच आहेत, ह्मणून आपण सर्वांशीं समतेनें वागलें पाहिजे. कारण हा स्वधर्मच आहे-हें तत्वज्ञान, ही नीतिकला आत्म्याच्या व्यापकपणांतूनच निघाली आहे.

५. मानवी आयुष्यांत समविषमता कां दिसतें याचें उत्तर पाश्चात्यांना बरोबर व समर्पक देतां येत नाहीं, व यामुळें ते क्षणोक्षणीं चुचकळ्यांत पडतात, व अंधारांत चांचपडणाऱ्या मनुष्याप्रमाणें त्यांच्या डोळ्यांला सत्यप्रकाश दिसत नाहीं. वेदांतानें ' जन्मान्तरा ' च्या मार्गानें ही अडचण दूर केली आहे. जन्मांतराचें रहस्य बृहदारण्यकांत चांगल्या प्रकारें स्पष्ट केलें आहे.

६. वेदांतानें कर्मवाद जगाला दिला आहे, व ' जसें पेरावें तसें उगवतें ' या सिद्धांतानें जीवाला प्रयत्नवादी बनविलें आहे. ' पेरिलें तैसें उगवतें ' हा सिद्धांत सर्व बाजूंनीं निराबाध आहे. याची फोड करण्याची जरूर नाहीं.

७. देव सगुण व निर्गुणही आहे. देवाला एक डोकें, दोन हात, दोन पाय एक शरीर नाहीं. ' सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपाद् ' याप्रमाणें पाहिजे तर देवाच्या सगुणरूपाचें ध्यान करावें, किंवा ' अव्यक्तोयमचिंत्योयमविकार्योयमुच्यते ' याप्रमाणें त्याच्या निर्गुणरूपाला ओळखावें. सगुण व निर्गुण हीं दोन्हींही देवाचींच अंगें आहेत, शक्य सार भजावें व मोकळें व्हावें.

८. वेदांत हें शास्त्रही आहे व धर्मही आहे. तत्वज्ञही येथें रमतो व भाविकालाही बंधमुक्त होण्याचा मार्ग येथें सांपडतो. वेदांताशिवाय असें दुसरें कोणतेंही शास्त्र नाहीं कीं, ज्या ठिकाणीं विचार व आचार, शास्त्रविचार आणि धर्माचार, बुद्धि आणि हृदय, इहलोक आणि परलोक हे दोन्हीही एकवटतात.

९. वेदांतांत उधारी नाहीं. रोकडा साक्षात्कार व स्वानुभव हवा त्या शुद्धचित्त मनुष्याला प्राप्त होतो.

वर्ष २, अंक ८.

# २१ परमार्थकथासंग्रह.

## १ योगी आणि साधु.

एकदां एक योगी एका साधूच्या दर्शनास गेला, व सिद्धीच्या डौलानें त्यास सांगूं लागला कीं, ' मला आकाशांत उडतां येतें, सहा सहा महिने पृथ्वीच्या पोटांत राहतां येतें, पाण्यावर तरंगतां येतें व कितीतरी चमत्कार करून दाखवितां येतात ! ' हें त्याचें भाषण ऐकून साधूस आश्चर्य तर वाटलें नाहींच, पण मीपणाच्या फासांत अडकून राहिलेल्या त्या योग्याची कींव येऊन साधू ह्मणाला, " बाबारे ? पक्षी आकाशांत उडतात. किडे व आळ्या पृथ्वीच्या पोटांत राहतात, आणि मासे पाण्यांतच अखंड वास करितात ! नरदेह धारण करणाऱ्या मनुष्यानें आपल्याहून खालच्या योनींतल्या प्राण्यांस अनायासें प्राप्त झालेल्या सिद्धींबद्दल गर्व वहावा हें कितीतरी वेडेपणाचें आहे ! मनुष्याला वाचा आहे, बुद्धि आहे, आपल्या ब्रह्मस्वरूपाचा प्रत्यक्ष अनुभव घेण्याचें सामर्थ्य आहे. तो सर्व प्राणिकोटींत श्रेष्ठ आहे. राजानें भिक्षेकऱ्याचा हेवा करावा हें आश्चर्य नव्हे काय ? सर्वगत, सर्वज्ञ व सर्व-शक्तिमान् अशा परमेश्वराच्या गुणाचें ध्यान कर, त्याचे गुण अंगांत आण, भूतमात्रीं हरीला पहा, व सर्वांच्या ठायीं निरपेक्ष प्रेम ठेव; ह्मणजे तुझा अहंभाव गळून जाईल व तूं समतेचें सौख्य पावशील. ' समत्वं योग उच्यते ' ह्मणजे चित्ताचें समत्व ठेवणें हेंच योगाचें सार आहे.

**सर्पाशीं वायुधारण । मीनाशीं जळतरण ॥**
**पक्षाशीं नभोगमन । हे जन्मसिद्धी जाण स्वाभाविक ॥२०१॥**
**हंस निवडी क्षीरनीर । कोकिळेसी मधुरस्वर ॥**
**चंद्रामृत सेवी चकोर । हे सिद्धी साचार जन्महेतु ॥२०२॥"**

—नाथभागवत, अध्याय १५.

सिद्धींच्या जाळ्यांत पडलास की स्वहितास मुकलास हें निश्चित समज. या सिद्धी भगवत्प्राप्तीला विघ्न करणाऱ्या आहेत. लौकिक प्रतिष्ठा मिरवणारे अधम सिद्धींची खटपट करितात. तात्पर्य काय कीं:—

**सकळ योगाचें योगगव्हर। वेदांत निजभांडार॥**
**सकळसिद्धींचे परमसार। भक्ति साचार हरीची" ॥ ५४१ ॥**

नाथभागवत, अध्याय १४.

योगीबुवांचा गर्वभार उतरला व ते साधूच्या पायीं लटकले हें सांगणें नकोच!

## २ 'पितामहस्य जगतो.'

विश्वाचे मायबाप जे परमेश्वर त्यांच्यांत एकदा विनोदाचा संवाद झाला. शंकर स एके सायंकाळीं घरीं येण्यास थोडा उशीर झाला म्हणून पार्वतीमाई रुसल्या, व शंकर घरीं येताच त्यांस उशीर होण्याचें कारण विचारू लागल्या.

**शंकर:**—माझ्या लेकरांना अन्नवस्त्र मिळालें कीं नाहीं, हें मी पहात होतों. त्याची व्यवस्था पाहून आलों. माझीं लेकरें अनंत आहेत, व तीं या विश्वमंदिरांतल्या चार खोल्यांत सामावली आहेत.

**पार्वती:**—चार खोल्या कोणत्या?

**शंकर:**—जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज या चार खाणी!

**पार्वती:**—सर्व प्राण्यांच्या तोंडांत आपणच अन्नपाणी घालतां?

**शंकर.**—होय. पशुपक्षी संग्रह करीत नाहींत, पण त्यांनाही मी चारा पुरवितों. कीडमुंगी कांहीं मागत नाहीं, पण त्यांनाही मी साखर देतों. विश्वाचें संरक्षण करणें हे माझें काम आहे. मीच अर्जुनाला 'पितामहस्य जगतो माता धाता पितामहः' असें सांगितलें नाहीं का? मी जगज्जनक आहें व सकल जीव हीं माझीं मुलें आहेत.

यावर पार्वतीबाई कांहीं बोलल्या नाहींत. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं एक कवठ घेतलें, त्याच्या आंत एक मुंगी लपवून ठेविली, व तें कवठ आपल्या

ओच्यांत त्याच्यावर लुगड्याचे पांच पदर घालून अगदीं जपून ठेवलें! रात्रीं शंकर घरीं आले.

**पार्वती**:—आपल्या लेंकरांची व्यवस्था करून आपण आलांत काय? सर्वांना अन्न दिलेंत ?

**शंकर**:—होय. आजच्या दिवसाचें काम झालें. माझा संसार मोठा आहे, मला सगळ्यांकडे पहावें लागतें.

**पार्वती**:—( मोठ्या ईर्षेनें पदरांतून कवठ बाहेर काढून ) पण एक तरी प्राणी असा राहिला आहे कीं, ज्याच्याकडे आपणाला पाहतां आलें नाहीं!

**शंकर**:—( हंसून ) पहा तर खरें !

पार्वतीनें कवठ काढून पाहिलें तों त्या मुंगीच्या तोंडांत एक तांदळाची कणी दिसली ! हें पाहतांच पार्वती गहिंवरली, तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले व अश्रुपूर्ण नेत्रांनी तिनें शंकराकडे पाहिलें व म्हणाली :—" हे जगन्नाथा, हे विश्वपालका, हे दयासागरा, तूं प्रेमाचा व दयेचा केवळ समुद्र आहेस. सर्व जीवांवर तुझी सारखी दृष्टि आहे. सर्वांवर तुझें सारखें प्रेम आहे. सर्वांचें तूं सारखें पोषण करितोस. तुझ्यापाशीं उच्चनीचभाव नाहीं. गरीब श्रीमंत हा भेद नाहीं. लघुगुरु ही कल्पना नाहीं. तुझा मायाळूपणा काय वानावा ? आम्हां स्त्रियांचें स्तन म्हणजे रक्त, मांस, व मल यांची खाण, पण त्या ठिकाणीं सुद्धां विमल दुग्ध निर्माण करून तूं लेंकरांना पोसतोस. धन्य तूं व तुझी दया ! " असें म्हणून परमभक्तानें पार्वतीनें परमेश्वराचे पाय घट्ट धरिले व ते प्रेमाश्रूंनीं न्हाणिले. परमेश्वरानेंही तिला प्रेमानें कुरवाळिलें व सुखी केलें.

## ३ देव कोठें आहे ?

दोन मुलें काखेंत पाटीदप्तर घेऊन शाळेंत जात होतीं. नास्तिकरावांचा मुलगा शंख्या रामरावाच्या भोळाराम नांवाच्या मुलास मोठ्या तोऱ्यानें म्हणाला:—' भोळ्या, देव कोठें आहे तें मला सांगशील तर मी तुला एक आंबा देईन. ' भोळ्यानें चटकन् उत्तर केलें, ' देव कोठें नाहीं हें मला तूं सांगशील तर मी तुला दोन आंबे देईन. '

## ४ जशास तसें.

एक पाद्री एकदां पंढरीस जाऊन खिस्ती धर्मावर व्याख्यानें देऊं लागला· स्वारीनें हिंदुधर्मावर व मुर्तिपूजेवर शिव्यांची लाखोली वाहायला सुरुवात केली. मोठ्या खुषींत येऊन व हातांतली काठी उंच करून तो मोठ्या हौलानें ह्मणाला, 'मी ह्या काठीनें तुम्हां हिंदु लोकांच्या मुर्तीला ठोकलें तर ती मूर्ति माझें काय करील ?' एक घोगड्या वारकरी खांद्यावर पताक घेऊन विठ्ठलनामाचा जयघोष करीत वाटेनें जात होता, त्याच्या कानावर हे शब्द पडले; तेव्हां तो पुढे सरसावला व त्या पाद्याला ह्मणाला:— 'मी तुमच्या देवास शिव्या दिल्या तर तो काय करील ?' पाद्यानें उत्तर केले, 'तुं मरशील तेव्हां तो तुला शिक्षा करील.' यावर तो वारकरी ह्मणाला, 'असाच आमचा विठोबाही तूं मरशील तेव्हां तुला शिक्षा करील !'

## ५ पृथ्वीप्रदक्षिणा.

पार्वतीपरमेश्वर एकदां सिंहासनावर बसले होते, व त्यांची मुलें गणपति आणि सुब्रह्मण्य हीं समोंवार बागडत होतीं. पार्वतीनें दोघां मुलांस जवळ बोलाविलें व ह्मणाली, 'माझ्यापाशीं एक उत्कृष्ट फल आहे, पण तें तुम्हांपैकीं जो पृथ्वीप्रदक्षिणा करून आमच्यापाशीं अगोदर येईल त्याला मी देईन.' हें ऐकतांच सुब्रह्मण्य आपल्या मोरावर बसले व बक्षिसाच्या लालसीनें पृथ्वीप्रदक्षिणेस निघून गेले. गणपतीबोवा विचार करीत तसेच बसले. ते महाबुद्धिमान होते. बुद्धितेजापुढें कसलीही विघ्नें टिकाव धरीत नाहींत. गणपती उठले व पार्वती–परमेश्वरास सभोंवार प्रदक्षिणा घालून आईपुढें लडिवाळपणानें हात पसरून ह्मणाले, 'हे आई, दे तें फळ मला ! माझी पृथ्वीप्रदक्षिणा झाली ! सारीं चवदा भुवनें तुमच्या पोटांत आहेत, व तुम्हाला प्रदक्षिणा घातल्यानें साऱ्या भुवनांची प्रदक्षिणा झाली. बाबांनींच कृष्णरूपानें अर्जुनाला सांगितलें ना कीं,—

**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ।**
**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ॥**

तुह्मां दोघांत सर्व ब्रह्मांड समावलें आहे, ह्मणून तुमच्या प्रदक्षिणेनें पृथ्वीप्रदक्षिणेचें फळ मला मिळालें पाहिजे.' या भाषणानें पार्वती प्रसन्न झाली व तिनें आपल्या जवळचें ज्ञानफळ त्या बुद्धिवंत गणेशाला दिलें. सुब्रह्मण्य परिभ्रमण करून आला, व फळ गणेशास दिलें हें पाहून फार खिन्न झाला. तात्पर्य, बुद्धिवंत प्राणी बसल्याजागीं जें आत्मज्ञानाचें फल मिळवितात व त्याच्या सुखानें तृप्त होऊन तुंदिलतनु होतात, तें फळ व तें सुख बुद्धिहीनाला पृथ्वी पालथी घालूनही मिळत नाहीं! 'तुझें आहे तुजपाशीं। परि तूं जागा चुकलासी,' देव जवळ हृदयांत असून वेडे लोक त्याला बाहेर धुंडतात.

## ६ प्रल्हाद आणि नरसिंह.

भगवंतानें श्रीनृसिंहरूपानें हिरण्यकशिपूचा वध केला व त्याचें पोट फोडून सारी आंतडीं बाहेर काढली. प्रल्हादानें स्तवन केल्यावर भगवंताचा राग ओसरला. आपल्या बापाचें पोट कां फाडलें हें त्यानें भीत भीत नृसिंहास विचारिलें, तेव्हां नृसिंह सौम्य व कोमल शब्दांनी ह्मणाले. 'बाळा, तुझ्यासारखा आणखी एखादा भक्तमणि हिरण्याच्या पोटात आहे की काय हे मी पाहिलें!

यासबधानें 'ढुंडिराज' नामक मराठी कवि ह्मणतो:—

**काढी अंतरमाळा, काळिज फाडुनि शोधिला काय।**
**कीं या पोटीं दुसरा भक्तसुमणि गुप्त राहिला काय! ॥ १ ॥**

वर्ष २, अंक १६.